शरद्-साहित्यमाला-१४

# ब्राह्मणाची मुलगी

[ डॉ. शरच्चंद्र चतर्जी यांच्या मूळ बंगालीवरून ]

: अनुवादक :

प. स. देसाई

किंमत २ रु.

नवभारत प्रकाशनसंस्था, मुंबई, ४.

बंगाल्यांतील कर्मठ ब्राह्मणवर्गांचे आचार किती कमाल मर्यादेला जाऊन पोचले होते व आचारांच्या नांवाखालीं अनाचाराचे किती भयंकर अत्याचार घडत होते यांचें कटुसत्य दाखविणारें असें हें हृदयस्पर्शी कथानक असून सुप्रसिद्ध वंगसम्राट श्री शरच्चंद्र चतर्जी यांनीं आपल्या विदारक लेखणीनें ते रेखाटलें आहे. कथा-वाङ्मयांत ही कादंबरी अत्यंत अपूर्व आणि खळबळ उडविणारी ठरेल.

—अनुवादक.

# — नवभारत प्रकाशन —

## नाथमाधवमाला

| | |
|---|---|
| वीरधवल | ४-०-० |
| (शालेय) | ०-१२-० |
| डॉक्टर कादंबरी | ४-०-० |
| सोनेरी टोळी | ३-०-० |
| देशमुखवाडी | ३-८-० |
| विमलेची गृहदशा | २-८-० |
| विहंगवृंद | २-८-० |
| शिवाजीमहाराजांचें आरमार अथवा सांवळ्या तांडेल | १-४-० |
| (शालेय) | ०-१२-० |
| सुहासिनी | २-०-० |
| हेमचंद्र रोहिणी | १-८-० |
| दोन भावंडें | १-८-० |
| (शालेय) | ०-१२-० |
| मराठ्यांचा आत्मयज्ञ | १-८-० |

## शरत्साहित्यमाला

| | |
|---|---|
| श्रीकांत भाग १ | १-४-० |
| श्रीकांत भाग २ | १-४-० |
| श्रीकांत भाग ३ | १-४-० |
| श्रीकांत भाग ४ | १-४-० |
| गांवगंगा | १-८-० |
| भैरवी | ३-०-० |
| काशीनाथ | १-८-० |
| माधवी | १-८-० |
| विजया | ३-८-० |
| चंद्रनाथ | १-४-० |
| चार मिनार | १-४-० |
| विराज-वहिनी | २-८-० |
| ब्राह्मणाची मुलगी | २-०-० |

## इतर प्रकाशन

| | |
|---|---|
| प्रणय | ३-८-० |
| आजच्या स्त्रियांचें आरोग्य | ३-०-० |
| वत्सराज उदयन | १-०-० |
| शालेय | ०-१०-० |
| बातमीदार | २-०-० |
| ध्रुवाचा तारा | २-०-० |
| अर्घ्यप्रदान | १-८-० |
| आहारशास्त्र | ३-०-० |
| मी घेतलेल्या मुलाखती | १-८-० |
| निबंधचंद्रिका | ०-१०-० |
| न्याय अन्याय | १-०-० |
| संध्या | १-४-० |
| जलतरंग | ०-१२-० |
| झाजर | १-०-० |
| सदा बंदिवान | १-८-० |
| माझ्या कलेसाठीं | १-०-० |
| सारस्वत | १-०-० |
| कोरडी करामत | ०-१२-० |
| करीन ती पूर्व | १-४-० |
| अरे बाबा जाहिरात ! | १-४-० |
| बाजीरावाचा बेटा | १-०-० |
| कुंजविहारी | १-४-० |
| तो आणि ती | ०-८-० |
| आशा आणि आशिर्वाद | १-५-० |
| आजोबांच्या मुली | ०-५-० |

**नवभारत प्रकाशनसंस्था, गिरगांव, मुंबई ४**

# १

आळोआळीं भटकण्याचें काम संपवून दुपार टळून [illegible]ात्र रासमणी घरीं येत होती. बरोबर असलेली दहा बारा वर्षांची न[illegible] पुढें चालली होती. वाटेंत एका अरुंद पाणदीच्या या बाजूला ब[illegible]चें पोर त्या बाजूला पडून झोंपीं गेलें होतें. त्यामुळें समोर नजर जातांच ती नातीला उद्देशून ओरडली, 'पोरी, दोरी ओलांडूं नको. ओलांडलीस ? हरामजादी, आभाळाकडे पाहून चालतेस ? तिथं तो बकरा बांधलेला आहे हें डोळ्यांनीं दिसत नाहीं वाटतं ?

नातीनें उत्तर दिलें, 'तें कोंकरूं झोंपलें आहे आजी !'

'झोंपलं आहे म्हणे. म्हणजे काय दोष गेला ? अग, आज शनीमंगळवार असतां तूं अगदीं सहज त्याची ती दोरी ओलांडून गेलीस !'

'त्याला काय होतं आजी ?'

'काय होतं ? काळतोंडे, ब्राह्मणाच्या घरची नऊ दहा वर्षांची तूं एवढी वाढलेली मुलगी, आणि बकऱ्याला बांधलेली दोरी ओलांडूं नये हें तुला माहीत नाहीं ? आणखी म्हणते काय होतं ! छे. बाबा. पोरांसोरांच्या या बकऱ्या बाळगण्याच्या त्रासानं माणसाला रस्त्यानं जाणं जोखमीचं झालंय् ! काय हें ! या मंगळवारच्या तिपारीं पोरीनं दोरी ओलांडली. काय म्हणून हा बकरा पाऊल वाटेच्या बाजूला बांधला ! म्हणतें, त्याच्या घरीं पोरेंबाळें नाहींत ? त्याचं बरंवाईट पाहाण्याची याला गरज नाहीं !'

याच वेळीं बारा तेरा वर्षांच्या एका शूद्र कन्येकडे तिची नजर गेली. ती पोर बिचारी घाबरीघुबरी होऊन आपल्या त्या अजाणत्या कोंकराला तेथून उचलण्यासाठीं घाईघाईनें येत होती. अर्थात् 'वाऱ्याला तोंड देणारी' रासमणी कोणाला तरी उद्देशून चाललेलें आपलें बोलणें बंद करून समोरून येणाऱ्या त्या पोरीचीच हजेरी घेण्याकडे वळली. ती तिला कर्कश स्वरानें म्हणाली, 'कोण ग तूं ? मरायचीच पाळी आली होती अगदीं. आंगाला

अशी घसटूनशी चाललीस ? डोळयांनीं दिसत नाहीं वाटतं ! म्हणतें, मुलीच्या आंगाला तुझा पदर तर लागला नाहींना !'

ती शूद्रकन्या अवघडून अडखळत म्हणाली, 'नाहीं आजीबाई. मी तर ही इकडून आलें.'

आपली मान पराकाष्ठेची वांकवून जळजळीत नजरेनें पहात रासमणी म्हणाली, 'इकडून आलें म्हणे ! पण म्हणतें, तुला इकडून जाण्याची गरजच काय ? तुझाच वाटतं तो बकरा ? बोल. तुझी जात कोण ती ?'

'आम्हीं 'दुले' आजीबाई.'

'दुले ? म्हणजे ? या अवेळीं माझ्या मुलीला शिवून तूं तिला न्हाण्याची पाळी आणलीस !'

तितक्यांत तिची नात ओरडली, 'मला तर ती शिवलीच नाहीं आजी—'

रासमणी तिला धमकावून म्हणाली, 'थांब ग तूं काळतोंडें ! या दुल्या पोरीच्या पदराचं टोंक तुझ्या अंगाला झटकून गेल्याचं मी पाहिलंसं वाटतं मला. जा. आतां या अवेळीं तळींत बुडी मारून ये. जा मर. न्हाऊन आलीस तरच घरांत पाय टाकूं देईन. नाहींरे देवा, आतां जात पात कांहीं राहिली नाहीं. या हलक्या लोकांनीं अगदी भंडावून सोडलं ! यांचा दिमाख वाढत चालला आहे. देवब्राह्मणाला हे मानीतच नाहींत. हरामजादे, दुलेवाडी सोडून तुझं तें कोंकरूं बांधायला तूं या ब्राह्मणवाडींत आलीस होय ?'

ती बिचारी दुली पोर भीतीनें आणि संकोचानें अर्धमेली होऊन गेली. तिनें तें कोंकरूं उचललें आणि त्याला पोटाशीं धरून ती इतकेंच म्हणाली, 'आजीबाई, मी शिवलें नाहीं तिला.'

'जर शिवली नाहींस तर या वाडींत मरायला आलीसच कशाला आधीं ?'

त्या पोरीनें हात लांबवून जवळच एका न दिसणाऱ्या घराचा निर्देश केला आणि सांगितलें, 'भटजीबुवांनीं आपल्या या गोठ्याजवळ आम्हांला राहायला जागा दिली आहे. आईला आणि मला दादासाहेबांनीं आमच्या वाडींतून काढून लावलं.'

कोणाचेंही असो आणि त्याचें कारण कांहींही असो पण एका कुटुंबाच्या अवनतीचा तो इतिहास ऐकून रासमणीचें कोपाविष्ट अन्तःकरण कांहींसें खूष झालें. इतकेंच नव्हे तर, ती आवडती हकीकत विस्तारानें ऐकून घेण्यासाठीं तिच्या अन्तःकरणांत कुतूहल उत्पन्न होऊन तिनें विचारलें, 'खरं ? कधीं ग घालवून दिलं ?'

'परवांच्या आइतवारीं आजीबाई.'

'अस्सं. तूं त्या एककडी दुल्याची पोर वाटतं! असं काय!! एककडी मेला न मेला तोंच म्हाताऱ्यानं तुम्हांला घराबाहेर केलं. बरं झालं. आग लागो या हलक्या जातीच्या तोंडाला! मी म्हणतें, बाई, त्यांनीं घरावेगळं केलं म्हणून काय तुम्हीं या ब्राह्मणवाडींत येऊन राहाल? तुमची तरी धिटाई कांहीं कमी नाहीं! कुणी ग आणलं तुझ्या आईला इथं? रामतनू वांडुज्याच्या जांवयानं वाटतं! त्याच्यावांचून दुसऱ्या कुणाला ही अक्कल सुचणार? घरजांवयानं घरजांवयासारखं रहावं; पण तसं कुठं आहे? बाबा, सासऱ्याची आयती इस्टेट मिळाली म्हणून काय ह्या वाडींत हाडी, डोम, डुले, कैवर्त या हलक्या आणि अस्पृश्य लोकांची वस्ती करशील कीं काय?'

बोलतां बोलतां मोठ्यानें ओरडून रासमणीनें हांक मारली, 'विचारतेच! संध्या, अग संध्या. घरांत आहेस का?'

उकिरडा पडलेल्या लहानशा तुकड्याएवढ्या उखरवाखर जमिनीच्या त्या बाजूला रामतनू वांडुज्याच्या दरवाज्याची दिंडी दिसत होती. म्हाताऱ्या रासमणीची हांक ऐकून त्या खिडकीचें दार उघडलें गेलें आणि एका एकोणीस वीस वर्षांच्या सुंदर मुलीनें बाहेर तोंड काढून विचारलें, 'कोण हांक मारतं हो? अगबाई, आजीच दिसते. कां ग—' असें विचारतां विचारतां ती स्वतःच बाहेर आली.

रासमणीनें तिला म्हटलें, 'तुझ्या बापाची अक्कल कशी वाहात चालली आहे हें तूं पाहिलंस कां पोरी! तुझा आजा रामतनू वांडुज्य म्हणजे एक नामवंत असा कुलीन गृहस्थ! त्याच्या जांवयानं आपल्या राहात्या वाडींत आजकाल बाग्दी–डुले लोकांना राहायला जागा दिली म्हणजे केवढी तिटकाऱ्याची गोष्ट आहे ही बाळ!'

मान वांकवून व आपल्या सुरकुतलेल्या चिपाड गालावर एक हात ठेवून ती आणखी म्हणाली, 'तुझ्या आईला एकदां हांक मार. जगो याचा निकाल करते तें पाहूं दे. नाहींतर मी स्वतः चाटुय्येदादाला सांगून येतें. तो तर एक जमीनदारच आहे. नामांकित बडा माणूस! तो काय म्हणतो तें तरी ऐकतें.'

अत्यंत आश्चर्यचकित होऊन संध्येनें विचारलें, 'झालं काय आजी?'

'बोलीव ना एकदां तुझ्या आईला. काय झालें तें तिलाच सांगून जातें.'

असें म्हणून आपल्या नातीकडे बोट दाखवून ती पुढें बोलूं लागली. ‘या मुलीनं आज मंगळवारच्या घातवारीं बकऱ्याला बांधलेली दोरी ओलांडली. ती दुल्याची पोर हिला शिवली. पदराचा झपाटा दिला हिला—’

मध्येंच दुल्याच्या मुलीला संध्येनें विचारलें, ‘ होय ग, तूं शिवलीस हिला ?

ती गरीब बिचारी पोर आपलें कोंकरूं पोटाशीं धरून तोंपर्यंत बाजूला उभीच होती. संध्येनें प्रश्न विचारतांच रडव्या आवाजानें ती म्हणाली, ‘ नाहीं ग ताई—’

रासमणीची नातही तिच्याच आवाजांत आपला आवाज मिळवून म्हणाली, ‘ नाहीं संध्याक्का. ही मला शिवली नाहीं. ती त्या बाजूनं—’

पण तिचें हें बोलणें तिच्या आजीच्या ओरडण्यांत तितकेंच राहून गेलें. ‘ पुनः नाहीं म्हणतेस हरामजादे ? चल. आधीं घरीं चल. शिवलीस कीं नाहीं तें तिथें जाऊन मी तुला दाखवितें.’

संध्या हंसून म्हणाली, ‘ बळजबरीनं तिला न्हायला लावलंस तर ती काय करणार आजीबाई ! ’

तिच्या त्या हंसण्यानें रासमणीच्या अंगाचा अगदीं तिळपापड झाला. ती म्हणाली, ‘ जबरी करीन नाहींतर पाहिजे तें करीन. ती माझी मर्जी ! पण तुझ्या बापाचा हा व्यवहार कसा आहे ? कोणता पांढरपेशा माणूस आपल्या राहत्या घरांत हलक्या जातीला पाय ठेवूं देईल ? एखाद्याला हलका ठरवितांना लोक तिरस्कारानें दुले म्हणतात ! आणि त्या दुल्याला आणून ब्राह्मणवाडींत बसवतां ? मी म्हणतें, घरजांवयानें घरजांवयाच्या पद्धतीनें राहिलें तरच तें चांगलें दिसतें.’

स्वतःच्या वडलांसंबंधानें काढलेल्या या अपमानकारक उद्गारांनीं संध्येला त्या म्हातारीचा राग आला. तिचा चेहरा आरक्त दिसूं लागला. आणि ती कांहींशा रुष्टतेनेंच म्हणाली, ‘ बाबा कांहीं दुसऱ्या कोणाच्या घरांत हलक्या जातीच्या लोकांना घेऊन गेले नाहींत आजी ! त्यांना योग्य वाटलं म्हणून त्यांनीं स्वतःच्या जागेंत या बिचाऱ्या गरीब माणसांना जागा दिली !! त्यामुळं तुमच्या अंगाला कां इतकी आग लागली ? ’

‘ कां लागली ? पहाशील तर ! अशीच जाऊं चाटुय्येदादाकडे ? जाऊन सांगूं ? ’

‘ बरं. बरं. सांग ना जाऊन. बाबांनीं काय त्यांच्या जागेंत यांना ठेवलं

म्हणून बाबांची ते मान कापतील ? थोर लोक झाले म्हणून काय झालं ?'

'म्हणजे असा लहान तोंडीं मोठा घांस घेतेस तूं ? अग तो दुसरा कोणी नव्हे, गोलोक चाटुय्ये बरं ! तुझ्या बापानं त्याला अजून ओळखलं नाहीं वाटतं ? ठीक—'

ही आरडाओरड ऐकून जगद्धात्री—संध्येची आई—बाहेर आली. तिला पहातांच आगीचा डोंबाळा उसळावा त्याप्रमाणें रासमणी खवळली, आणि आपल्या ओरडण्यानें सगळी ब्राह्मणवाडी दणाणून सोडीत म्हणाली, "ऐक. जगो, ऐक—तुझ्या या शिकलेल्या मुलीच्या तोंडचे बोल ऐक. लिहिणंवाचणं शिकली कीं नाहीं ! म्हणते, सांग तुझ्या त्या गोलोक चाटुय्याला माझ्या बाबांची मान तोडायला ! आणखी म्हणते, स्वतःच्या जागेंत हाडी-दुले आणून ठेवले हें बरं केलं. कुणा बापजाद्याच्या जागेंत तर ठेवले नाहींत ना ? असे पुष्कळ बडे लोक पाहिले आहेत. कुणाला काय करून घ्यायचं असेल तें करून घेऊं देत. ऐक-तुझ्या मुलीचं हें बोलणं एकदां ऐक !"

जगद्धात्रीला आश्चर्य वाटलें. तिनें रागावून आपल्या मुलीला विचारलें, 'असं म्हटलंस तूं ?'

संध्या मान हालवून म्हणाली, 'नाहीं. मी असं म्हटलं नाहीं.'

तोंच रासमणी तिच्या तोंडासमोर हातवारे करून म्हणाली, 'तूं म्हटलं नाहींस ! हे सगळे साक्षी आहेत बरं !'

पण दुसऱ्याच क्षणीं आपला उंचावलेला तीव्र स्वर अनिर्वचनीय कौशल्यानें उच्च सप्तकांतून एकदम खोलच खोल खर्जात आणल्याप्रमाणें खालावून जगद्धात्रीला उद्देशून बोलूं लागली, 'मुली, मी तुझ्या बऱ्याभल्यासाठींच सांगत होतें. मंगळवारच्या दुष्ट वेळीं मुलीनें बकऱ्याला बांधलेली दोरी ओलांडली म्हणून म्हटलं, अरेरे, कुणी असं हें वाटेंत कोकरूं बांधलं ग ! तोंच ही दुली पोरटी जी धांवत आली तिनें या माझ्या बाळीच्या तोंडावरच पदराचा फटकारा मारला. आणि म्हणते कशी, भटजीमहाराजांच्या जागेंत कोंकरू बांधलं आहे. तूं विचारणारी कोण ? म्हणून बाई तुझ्या लेंकीला हांक मारली आणि हें सगळं सांगून म्हटलं, माझ्या बाळीला या अवेळीं न्हायची पाळी आली ! दुष्ट वेळीं तिनं बकऱ्याची दोरी ओलांडली. तुझ्या बापानं जर या मायलेकींना दुलेवाडींतून आणून इथं जागा दिली तर आपल्या शेळ्या बकऱ्यांना जरा जागा पाहून सवरून बांधायला सांग. अग या हलक्या

जातीच्या लोकांना चालीरीतींचं आचारविचाराचं ज्ञान तें कितीसं असणार ? शिवाय चाटुय्ये दादा म्हातारा माणूस. या रस्त्यानें जातो येतो. तेव्हां कांहीं कमजास्त झालं तर उगाच रागवाबिगवायचा ! झालं मुली हेंच माझं बोलणं. यावर तुझ्या या लाडक्या संध्येनं मला मारायचं तेवढं ठेवलं ! म्हणते जा– जा– तुझ्या त्या चाटुय्येदादाला बोलावून आण जा. त्याच्यासारखे बडे लोक मी पुष्कळ पाहिले आहेत ! तुझ्या बापाच्या जमिनींत जेव्हां हाडे दुले घरं बांधायला येतील तेव्हां त्यांची व्यवस्था पाहायला तूं त्याला बोलाव. तूंच सांग बाई आतां. हें बोलणं काय या एवढ्याशा मुलीला शोभतं ? '

जगद्धात्रीनें पुनः अत्यंत रागानें आपल्या मुलीला विचारलें, ' तूं असं बोललीस ? '

संध्या आतांपर्यंत आश्चर्यचकित होऊनच रासमणीच्या मानभावी बोलण्या-कडे पहात होती. पण आईचा तो रागाचा स्वर ऐकतांच तिनें चमकून मान फिरविली आणि फक्त ' नाहीं ' एवढेंच उत्तर दिलें.

' बोलली नाहींस ? मग मावशी काय खोटं सांगते ? '

' पहा बाई. तूंच आतां तुझ्या मुलीला काय तें सांग.'

संध्या क्षणभर स्तब्ध राहिली आणि नंतर तिनें आपल्या आईला उत्तर दिलें. ती म्हणाली, ' कुणाचं खोटं तें कांहीं मला सांगतां येणार नाहीं आई ! पण तुला आपल्या स्वतःच्या मुलीपेक्षा जोडलेल्या नात्याची मावशीच जर जास्त विश्वासाची वाटत असेल, तिचा जास्त परिचय असेल तर ती म्हणते तेंच खरं मान.'

इतकेंच बोलून दुसरा प्रश्न विचारण्यापूर्वीच उघड्या असलेल्या दरवाजां-तून घाईघाईनें पावलें उचलीत ती आंत निघून गेली. दोघीही विस्फारित नेत्रांनीं ती गेली त्या बाजूकडे पहात राहिल्या आणि हीच संधी योग्य आहे असें मानून दुले पोरगीही आपलें कोंकरूं पोटाशीं धरून पाय वाजूं न देतां तेथून निसटली.

रासमणी म्हणाली, ' पाहिलीस ना जगो तुझ्या मुलीचा ताठा ! बोलणंही ऐकलंसच. म्हणे जोडलेल्या नात्याची मावशी ! कुलीन गृहस्थाच्या घरची मुलगी म्हणून, नाहींतर एव्हांना लग्न होऊन पांचसहा मुलांची आईही झाली असती ! जोडलेली मावशी ! ऐकलंस ना ? '

जगद्धात्री स्तब्धच होती त्यामुळें रासमणीलाही थोडा वेळ आपलें वाचाळ

तोंड बंद ठेवावें लागलें; पण तितक्यांत कसलीशी आठवण होऊन तिनें विचारलें, ' होय जगो, अमर्त चक्रोतीच्या मुलाला अजूनही आपल्या घरांत तूं येऊं देतेस असं ऐकलं मी ! खरी का ही गोष्ट ? '

जगद्धात्री मनांतल्या मनांत अतिशय शंकित झाली. तिला वाटलें हा काय आणखी गहजब !

रासमणीचें बोलणें चालूच होतें. ' मी तर बाई त्या दिवशीं पुलिनच्या आईबरोबर चांगली भांडलेंसुद्धां ! म्हटलं ती जगद्धात्रीची मुलगी आहे ! ! दुसरी तिसरी नव्हे कोणी ! हरिहर बांडुय्या महाशयांची नात आणि रामतनू बांडुय्याची मुलगी. जो कायस्थांनाही शूद्र समजून त्यांच्या घरांत पाऊल टाकीत नाहीं तो काय या बाटग्या पोराला मलेंच्छ झालेल्याला आपल्या घरांत येऊं देईल ! तूं म्हणतेस तरी काय ? '

हितकर्त्या मावशीची ती कळकळ आणि कैवार घेण्याची तत्परता पाहून आपल्या स्तब्धतेची जगद्धात्रीला लाज वाटली. आपल्या ओंठावर नीरस आणि रुक्ष हास्याच्या रेषा उमटवीत ती म्हणाली, ' खरं आहे तुझं म्हणणं मावशी. तरी पण काय आहे सांगूं, अगदीं लहानपणापासून तो आमच्या घरीं येतो जातो, मला काकी म्हणून हांक मारल्याशिवाय त्याच्यानें राहावत नाहीं. म्हणून कधीं आठाकाळीं बारामाशीं तो घरात आला तर ' अरुण, तूं आतां आमच्या घरांत पाऊल टाकूं नको.' असं कांहीं माझ्यानं म्हणवत नाहीं. अगदीं आईबापावेगळा त्यामुळं बिचाऱ्याला पहातांच दया येते.'

रासमणी हें ऐकून प्रथम थक्क झालेली दिसली; पण नंतर क्रुद्ध झाली आणि रागारागानें म्हणाली, ' असल्या दयेला आग का लावीनास ! ' पुढें अकस्मात् या क्रोधाची कमान अत्यंत उंच वाढली आणि या उंचीशीं आपल्या आवाजाची पातळी समांतर करून तिनें चढत्या स्वरांत आपलें वाक्तांडव सुरू केलें ! ' त्या एकलकोंड्या दुर्मुखलेल्या पोरट्याला तूं काय साधाभोळा समजलीस ? अग असला नतद्रष्ट पोरटा या उभ्या गावांत तुला दुसरा आढळणार नाहीं. तुला सांगून ठेवतें, चाटुय्येदादा कसा झाला तरी जमिनदार माणूस ! त्यानें स्वतःच्या कार्ट्याला बोलावून आणून म्हटलें, ' अरूण, वरकमाईचा लोभ सागरार्पण करून तूं घरचा मुलगा घरीं बैस कसा ! विलायतेला कशाला जातोस ? जाऊंच नकोस. ' पण काय या कार्ट्यानं त्या एवढ्या थोर माणसाचं बोलणं ऐकलं ? एवढ्या मोठ्या योग्य-

तेच्या माणसाचा त्यानं मान ठेवला ? नाहीं. उलट ' विलायतेला जातांना हा पोरटा हंसत हंसत त्यांना कसं म्हणतो, ' विलायतेला जाण्यानं माझी जात बुडत असली तर ती खुशाल बुडूं दे. मला त्यांत मुळींच वाईट वाटणार नाहीं. उलट बरेंच वाटेल. पण गोलोक चाटुय्याप्रमाणें विलायतेला खंडोगणती बकरे रवाना करून पैसे कमावण्याचा धंदा मी मुळींच करणार नाहीं. आणि समाजाच्या पुढारीपणाचं नसतं ढोंग माजवून लोकांवर विनाकारण बहिष्कार घालीत फिरण्याचंही मला कारण नाहीं. ' असा बोलला तो. ओः त्यावेळीं मी जर त्या ठिकाणीं असतें जगो, तर केरसुणीनंच बेट्याचं तोंड सरळ केलं असतं ! जो गोलोक चाटुय्ये जेवला तरी गोमयानं तोंड धुतो, त्याला या कालच्या पोरानं— '

जगद्धात्री मध्येंच नम्रपणानें तिला म्हणाली, ' पण अरुण तर कधीं कुणाची निंदा करीत नाहीं मावशी ! '

' तर मग काय मीच खोटं बोलते वाटतं ? चाटुय्येदादा म्हणजे—'

' छे–छे–ते कशाला म्हणतील ! पण लोक हे पराचा पारवा करण्यांत— बनवून सांगण्यांत— '

' तुझं आपलं एकच बोलणं जगो ! लोकांना काय आपापला घरप्रपंच नाहीं म्हणून ते असली बनवाबनवी करतील ? बरं, तसं पाहिलं तर विलायतेला जाऊन तरी हा काय असा पंडित बनून आला ग ? शेती कशी करावी हीच शेतकऱ्यांची विद्या शिकलाना ? अग, हें ऐकून हंसतां हंसतां माझी मुरकुंडी वळली. चक्कोनी असूं दे अथवा दुसरा कोणी असूं दे; पण ब्राह्मणाचा मुलगा तर खरा ? गांवांत काय शेतकरी नव्हते ? आतां हा काय नांगर बैल घेऊन शेतांत जमीन नांगरायला जाणार ? जळ्ळं मेलं ऐकावं तें एक एक नवलच!'

रासमणीच्या आवाजाची तीव्रता हळू हळू वाढत चालल्यामुळें तो आवाज ऐकून शहाणपणाचा अभिमान बाळगणाऱ्या शेजार-पाजारच्या मंडळीचा मधमाशांप्रमाणें तेथें घोळका जमेल या भीतीनें जगद्धात्री हळूच तिला म्हणाली, ' अग पण उभ्या उभ्यानं कां मावशी ? आंत येऊन थोडा वेळ बसून नाहीं जात ? '

' नाहीं ग बाई ! दुपार टळून तिपार झाली. आतां बसत नाहीं. मुलीचंही न्हाणंधुणं आटपून तिला घरांत घेतली पाहिजे. दुल्याची पोरटी पळाली वाटतं ?'

' होय आजी. तूं त्यावेळीं बोलण्यांत गढून गेली होतीस. पण ती मला

शिवली नाहीं बघ— '

' हरामजादे, पुनः नाहीं म्हणतेस ? पण जगो, सांगून ठेवतें बाई या वाडींत हाडीदुल्यांना पाय ठेऊं देऊं नकोस. जांवईबुवांनाही सांग.'

' सांगेन तर काय झालं मावशी ! मी तर या दुल्यांना उद्यांच इथून वालवून देतें. अग हीं माणसं इथं अशीं राहिलीं तर आम्हांला तळी विहीरी दुरावतील ! शिवाय त्यांनीं केलेल्या ओलीवरून आम्हांला जावं लागेल ना ? '

' म्हणूनच मी तसं म्हणतें मुली ! माझं म्हणणं हेंच; पण आजकालच्या मुलीमुलं हें मानीतच नाहींत ! आणि यासाठींच त्या दिवशीं चाटुय्येदादांनीं जेव्हां हें ऐकलं तेव्हां ते मला म्हणाले, ' रासू, आमच्या जगद्धात्रीच्या मुलीला तिचा बाप लिहिणं वाचणं शिकवितो म्हणे ! पण असं करूं नको म्हणावं त्याला असं करूं नको. लिहिणें वाचणें शिकल्यानें मुली अधोगतीला जातात. '

जगद्धात्री बिचारी भिऊन गेली, व तिला कांहीं न सुचून ती म्हणाली, ' चाटुय्येमामा असं म्हणाले ? '

' म्हणूं नये त्यांनीं ? अग किती झालं तरी समाजाचं पुढारीपण आज त्यांच्याकडे आहे. गांवचे जमिनदारहिं तेच. मग गांवांत कोणतीही एकादी बरीवाईट गोष्ट घडली तर त्यांना ती कळल्यावांचून कशी राहील ? माझंच पहा. म्हटलं तर माझं आतां बरंच वय होऊन गेलं. लिहिण्यावाचण्याची कांहीं फिकीर केली नाहीं. पण कोणतं शास्त्र मला कळत नाहीं सांग पाहूं ! रासू भटणीनें अमुक एक काम शास्त्राविरुद्ध केलं असं कोणाच्या बापाला तरी म्हणतां येईल का ? हेंच पहा. या पोरीनं आतांच बकऱ्याला बांधलेली दोरी ओलांडली त्याबरोबर अंग शहारून मी म्हटलं, ' अग पोरी, मंगळवार सारख्या घातवारीं तूं काय केलंस हें ! कोणाही पंडिताला विचार तो यांत दोष आहे असंच सांगेल आणि माझं सांगणं योग्य आहे असं म्हणेल. अग, माझ्या हातून तसं कधीं होत नाहीं आणि नजरेला दिसलं तर स्पष्टपणानं बोलल्यावांचून माझ्याच्यानं राहावत नाहीं. मग ती माझी लेंक असो अगर दुसऱ्याची असो. माझ्या आईबापानीं मला शिकविलं तें:हेंच. तुझ्या शिकल्यासवरलेल्या मुलीला आतांच बोलाव. ती यावर काय उत्तर देते पाहूं. '

जगद्धात्रीनें अगदीं निमूटपणानें आपली चूक कबूल केली आणि म्हटलें, ' थोडा वेळ बसून तरी जायचं होतंस मावशी ! '

'नाहीं ग बाई. आधींच उशीर झाला आहे. आणखी एखादे वेळीं येईन.' चल खेंदी घरीं चल.' असें म्हणून नातीला पुढें चालायला सांगून आपण कांहीं पावलें चालल्यावर रासमणीनें एकदम मागें वळून जगद्धात्रीला विचारलें, 'काय ग जगो, असलं हें स्थळ तूं हातचं कां घालविलंस सांग पाहूं!'

'नाहीं. तसं अगदींच कांहीं हातचं घालविलं नाहीं. तरी पण स्वतःचं घरदार शेतवाडी कांहीं नाहीं, वयही बरंच झालेलं शिवाय तिकडचं तरी कुठं तसं मत आहे?'

रासमणी आश्चर्यचकित होऊन थबकली आणि उभ्याउभ्यानेंच म्हणाली, 'वा: ऐकावं तें नवलच! म्हणतें, त्याचं एक घर नाहीं. कबूल. पण तुझं तर आहे ना? बरं तुला काहीं मुलगा नाहीं. शिवाय तुझी काळजी राहील अगर तुला काळजी करायला लावील अशी दुसरी मुलगीही नाहीं. एकुलत्या एका मुलीची तूं आई. मुलगी जांवयाचा संसार थाटला असतास तर काय बिघडलं असतं बाई? आतां वय! कुलीनाच्या मुलाचं चाळीस बेचाळीस वय म्हणजे काय तें वय म्हणायचं! तसं म्हटलं तर रसिकपुरच्या जयराम मुखर्ज्याचा नातू! त्याच्या वयाबद्दल विचार तो काय करायचा जगो! तें एक जाऊं द्या. पण मुलीच्या वाढत्या वयाकडेही पहायला नको का? आणखीं मागें पुढें केलंस तर तिचं लग्न होणार तरी कधीं? शेवटीं काय तुझ्या धाकट्या आतेप्रमाणं तिला कायमची कुंवारीण ठेवण्याचा विचार आहे तुझा?'

जगद्धात्री कांहींशा संकोचानें म्हणाली, 'मीही तेंच म्हणतें मावशी; पण मुलीचे वडील अगदीं—'

तिचें वाक्य संपविण्याला अवधी देण्याइतकाही रासमणीला धीर निघेना. ती रागानें उसळून म्हणाली, 'मुलीचा बाप कशाला बोलेल? त्याचं लग्न झालं त्यावेळीं त्याची थोडीच घरवाडी आणि शेतजमीन होती! अहाहा! काय पण मुलीची काळजी वाहणारा! अगदीं हंसू येतं बाई तुझं मला. शिवाय या अरुणाचंच पहाना. रात्रंदिवस दोघांची एक बैठक. गाणेंबजावणें चाललेंच असतें. मला वाटतें चिलीम गुडगुडीपर्यंतही मजल गेली असेल. मग एवढीच एक गोष्ट त्याला बोलतां येत नाहीं होय? अग इतक्या निकट-सहवासांत असतांना एवढीच एक गोष्ट तो बोलणार नाहीं तर काय चाटुग्ये-

दादा बोलणार ? तुझी अगदीं हद्द झाली बरं जगो ! पण मी हें सांगून ठेवतें तुला, बाई घरबसल्या जर वर मिळत आहे तर नाहीं नाहीं म्हणून दिरंगाई करूं नका. तसं कराल तर शेवटीं अति तिथं माती, अति लोभ करमभोग असं होऊन जाईल. अति लोभ मसणभोग. तेव्हां तसं करूं नको. तुझी धाकटी आते गुलाब ही थेरडी कुंवार होऊन मेली. तुझ्या वडलांच्याही दोघी आत्यांचं लग्न झालं नाहीं. आणि तुझे आईबाप काशीला गेले नसते तर काय तुझं तरी लग्न झालं असतं पोरी ? विहीण क्षेत्रवासी झालेली. ना जाच ना छळ. जांवई शाळेंत शिकत असलेला, जणूं काय घरीं चालून आलेलाच वर मिळाला ! मग काय चटकन् दोघांचे हात एक केले, आणि जांवई घेऊन गांवचीं माणसं परत गांवीं आलीं. लग्न मोडेल या भीतीनं आरंभीं कुणाला एक शब्दमुद्धां कळविला नाहीं. बरं झालं त्यावेळीं तसं केलं म्हणून. नाहीं तर हें लग्न झालं असतं कीं नाहीं कुणाला माहीत ! चल ग खेंदी चल. जयराम मुखऱ्याची नात. त्यात आणखी घरधरठाण. त्यांत पुनः वय झालेलं. आणखी पुनः काळसावळी. अग हळू हळू आणखी किती काय ऐकाव लागेल. हं. चल. आता उशीर नको. अंगधुणं आहेच. जेवायला दिवे लागणार. कारण जप आन्हिक सर्व कांहीं राहिलं आहे. आणि तें सर्व कांहीं झाल्याशिवाय तर तोंडांत पाणी घालायचं नाहीं. मला वाटतं आज हें सगळं आटपायला प्रहर रात्र तरी होईल. तरी पण जगो, तुझी मला काळजी म्हणून सांगून ठेवतें, खिस्त्याफ्रिस्त्याला घरात येऊं देऊन त्याच्याशीं मुलीचं हंसणं खिदळणं चालूं देणं कांहीं योग्य नाहीं. कुणाच्या तोंडावर कुणी हात ठेवावा ? हां हां म्हणतां लोकवार्तेला पाय फुटतात आणि तसं झालं म्हणजे मुलीला स्थळ वगैरे मिळणं कठीण होईल. अग पोरटे खेंदी, चलना. दुसऱ्याच्या गोष्टी ऐकायला मिळाल्या म्हणजे तुला अगदीं जागचं हाला-यलाहि नको असं दिसतं—'

तोंडानें बडबड चालली असतांनाच नातीला पुढें लोटून रासमणीनें जाण्यासाठीं पाऊल उचललें. जगद्धात्री बिचारी शंकित आणि विषण्ण चेहेऱ्यानें कांहीं वेळ तिच्याकडे पहातच राहिली. पण रासमणी पाठमोरी वळतांच ती भानावर येऊन म्हणाली, अगबाई, मावशी निघालीसच अगदीं. खेंदी थोडी थांब हं बाळ. शेतावरून काल टोपलीभर नवीन भुवनकेशी वांगी आणि एक चांगला फणस आला आहे. तेव्हां त्यांतील थोडीं वांगीं आणि

फणसाची फेंस देतें तेवढी घेऊन जा बरं. ही बघ मी चटकन् आलेंच—'

रासमणी थांबली. तिचा चेहरा प्रसन्न झाला. नातीला तिनें थांबविलें. आणि घाईघाईनें घरांत जात असलेल्या जगद्धात्रीला उद्देशून आल्हादयुक्त स्वरानें ती म्हणाली, अगबाई, वांगीं इतक्यांत येऊं लागलीं वाटतं!'

पण जगद्धात्री घरांत जातांच एका क्षणांत आपला स्वर खालावून ती नातीला म्हणाली, अग ए खेंदी, जळ्ळं तुझं तोंड तें. खुंटासारखी उभी काय राहिलीस! बरोबर जा ना तिच्या— '

ती जाऊं लागतांच पुनः मागाहून हांक मारून तिनें सांगितलें, 'धांवत ये बरं खेंदी. मी तोंपर्यंत पुढं जातें— '

## २

संध्या घराच्या पायरीवर बसून तन्मयतेनें शिवणकाम करीत होती. जगद्धात्री आपलें आन्हिक संपवून देवघराच्या बाहेर आली आणि क्षणभर मुलीकडे टक लावून पाहात राहिल्यावर म्हणाली, 'सकाळपासून कसली ग इतकी शिलाई चालली आहे संध्ये? अग, दुपार होऊन गेली तरी अजून तुझं अंगधुणं व्हायचं आहे. जेवणखाण कांहीं करायचं नाहीं का? परवांपर्यंत तर तुझं पथ्याचं चाललं होतं! पुनः पित्त वाढून आजारी पडशील बरं; सांगून ठेवतें!'

वाढता दोरा दांतांनीं तोडून टाकून संध्या म्हणाली, 'बाबा अजून आले नाहींत आई!'

'बाकी सगळं माहीत आहे मला; पण बिनपैशाची वैद्यकी संपायला किती वेळ लागतो तेंच तेवढं मी जाणत नाहीं!'

यावर कांहीं न बोलतां संध्येनें आपलें शिवण्याचें काम पुढें चालविलें.

शेवटीं आईनें तिला विचारलें, 'कसली इतकी शिलाई चालली आहे तें तरी ऐकूं दे.'

मुलगी अगदीं अनिच्छेनें अस्पष्ट स्वरानें म्हणाली, 'हीं दोन बटणं लावतें आहें.'

'तें मी जाणतें बरं चांगलं. नाहींतर माझ्या लुगड्याला ठिगळ लावीत आहेस कीं काय म्हणून नाहीं विचारीत! पण काय ग संध्ये, तूंच त्यांची इतकी काळजी वाहातेस ती आणखीं कुणाचे नव्हतच का ते? कुठं एक दोन बटणंच तुटलीं, कुठं धोतराला एवढा ढोबळाच पडला, कुठं पैरणीला

एवढा डागच लागला, वाहणेची कुठं शिवणच उसवली, हेंच रात्रंदिवस पहात बसतेस ! अग एवढ्या या संसाराच्या पसाऱ्यांत दुसरं कांहीं कामच नाहीं तुला वाटतं ! ! '

संध्या वर मान करून आपल्या आईकडे पहात किंचित हंसून म्हणाली, ' या असल्या बारीक सारीक गोष्टी बाबांच्या नजरेलाच येत नाहींत आई ! '

आपल्या मुलीचा हा जबाब ऐकून आईला कांहीं आनंद वाटला नाहीं. ती म्हणाली, कसं आणि केव्हां येणार नजरेला ? बिनपैशाची वैद्यकी करण्यापुढं वेळ मिळेल तेव्हां ना ? हें बघ, ती दुली पोरटी गेली का ग ? '

' जाईल तर काय करील आई ! '

' पण ती कधीं ? शिवून सवरून जातपात नाहींशी केल्यावर ! अग पुनः तो एवढा मोठा दोरा कशाला ओवूं लागलीस ? उठायचं नाहीं वाटतं ! '

' तूं जा ना आई. मी ही इतक्यांत आलेंच. '

' तूं ही अशी आजारी. मी काय सांगूं ? जसं तुला वाटेल तसं कर बाई ! तुम्हां दोघांबरोबर बकूबकू करून माझं डोकं अगदीं भणाणून गेलं आहे. संसारांत माझी आतां कुणाला गरजच उरलेली नाहीं. मी काशीला सासुबाई-जवळच जाऊन राहतें कशी ! खरंच जाईन. मी स्पष्ट सांगून ठेवतें आपली."

असें म्हणून जगद्धात्रीनें रागारागानें पितळेची कळशी उचलली आणि खिडकीजवळच्या तळीकडे घाईघाईनें निघून गेली.

संध्या खालीं मान घालून व ओंठ घट्ट मिटून किंचित हंसली मात्र. आईच्या कोणत्याच प्रश्नाला तिनें उत्तर दिलें नाहीं. तिचें शिवणकाम बहुतेक संपत आलें होतेंच. त्यामुळें सुईदोरा वगैरे सामान एकत्र करून तें तिथल्याच एका साबणाच्या रिकाम्या पेटींत तिनें भरलें आणि आतां ती उठणार तोंच समोरच्या बाहेरील दरवाजांतून आंत येतां येतां मोठमोठ्यानें बोलत असलेल्या वडलांचा शब्द ऐकून तिनें चमकून वर पाहिलें.

तिचे वडील आपले नेहमींच गडबडींत असायचे. आतांही ते तसेच होते. हातांत होमिओपाथिक औषधांची एक लहानशी पेटी आणि घट्ट दाबून धरलेली वैद्यकीचीं कांहीं पुस्तकें अशा थाटांत अव्यवस्थित पोषाखासह त्यांनीं घराच्या सोप्यांत पाऊल टाकलें. मुलगी समोरच होती. तिच्याकडे नजर जातांच ते म्हणाले, ' संध्या, ऊठ बरं बाळ, चटकन माझी औषधांची मोठी पेटी एकदां—काय करावें कांहीं सुचेनाच—अशा या अडचणीच्या वेळीं—'

संध्या घाईघाईनें त्यांना सामोरी गेली आणि वडलांच्या हातांतील पेटी व पुस्तकें वगैरे सामान घेऊन तिनें बाजूला ठेवलें. नंतर सोप्यांत पूर्वीच अंथरलेल्या तरटावर हाताला धरून त्यांना बसवून पंख्यानें वारा घालीत ती म्हणाली, ‘ आज तुम्हांला इतका उशीर कां झाला बाबा ? ’

‘ उशीर ? अग मला काय स्नान आणि जेवण करायला फुरसद आहे असें तूं समजतेस ? मला एकाद्या रोग्याकडे जायला वेळ झाला नाहीं कीं तो किती रागावतो आणि रुसतो ! प्रिय मुखय्याच्या हातचें एक थेंबभर औषध मिळालें नाहीं तर आपण जणुं काय वांचणार नाहीं अशीच त्या बिचाऱ्याची समजूत झालेली असते. आतां त्यांची ही भीति जरी अगदींच खोटी आहे असें माझ्यानें म्हणवत नाहीं तरी पण प्रिय मुखय्ये एकटाच. दोन तर नाहींत ! मी त्याना म्हणतों, तो नंद मित्तिर कसाही असो; पण थोडीफार प्रॅक्टिस करतोच ना ? आतां एकदोन महत्त्वाचीं औषधें त्याला कदाचित् माहीत नसतील, नाहीं असं नाहीं. पण तें त्यांना मानवत नाहीं. मुखय्ये बाबाच पाहिजे. तो कांहीं चालणार नाहीं. मग त्या हटवादी लोकांना सांगूं तरी काय ? एक म्हणतो एकाद्या औषधाचें सिम्टंपस् सांगा. पण छे —अरे इतकी सहजसाध्य होणारी ही विद्या नव्हे ! सोपं नाहीं हें काम ! ! तसें असतें तर सगळेच डॉक्टर झाले असते. प्रिय मुखय्ये सगळयांनाच म्हणतां आलें असतें—’

‘ बाबा, पोषाख काढा ना. ’

‘ काढतों बरं बाळ. हें आजचंच प्रकरण पहा. एकदम पल्सेटिला देऊन टाकलें त्यानें ! अरे प्रॅक्टिस तर करतोस मग सांग पाहूं त्याचें ॲक्शन ? पाहूं माझ्या इतकें तुला तोंडपाठ आहे का तें ! संध्या, उघड तें पुस्तक. एकदां पल्सेटिला —’

‘ तुम्हाला आतां पुस्तक कशाला ? स्नान जेवण आटोपल्यावर मीच तें वाचून तुमच्याकडून सगळं शिकून घेतें. शिकवाल ना मला बाबा ? ’

‘ शिकवीन तर काय झालं बाळीला ? शिकवीन बरं. नक्समध्यें फरक असतो. अस्सल—तें पुस्तक एकदां—’

‘ तुमच्या पायांना तोंपर्यंत तेल लावूं बाबा ? फारच उशीर झाला आहे. आई आणखी रागावेल ! ’ बोलतां बोलतां तळीवरून आई येते आहे कीं नाहीं तें संध्येनें एकवार भयचकित नेत्रांनीं पाहिलें आणि वडलांनीं संमती

देण्याची वाट न पहातांच जवळच्या कोनाड्यांतून तेलाची वाटी घेऊन ती त्यांच्या दमल्या भागलेल्या पायांना आपल्या हलक्या हातांनीं तेल लावूं लागली.

‘ आ: अग थोडावेळ थांबलीसही नाहीं. एकदां तें पुस्तक पाहून—’

‘ आज कुणाकुणाला पाहिलंत बाबा ? आणि त्या पंच्या जेल्याचे आजोबा—’

‘ तो म्हातारा ? बेटा मरणार–मरणार–मरणार ! तूं पाहात राहा संध्ये. आणि तो पराणे चाटुय्ये ! त्या हरामजाद्याच्या नांवानें मी केस केल्यावांचून राहाणार नाहीं. जो रोगी मी मिळवीन त्याला आपला हा फोडतो. त्यामुळें एका दिवसापेक्षां जास्त असें माझें औषधच कोणी घेऊं शकत नाहीं. कां असें ? या नतद्रष्ट पाजी घुबडामुळें माझा असा निरुत्साह होतो. हा काय करतो माहीत आहे ? पंचाच्या आजोबाला मी एक रेमिडी सिलेक्ट करून देऊन आलों, तोंच हा माझ्या मागोमाग तेथें जाऊन त्याला म्हणतो, पाहूं काय दिलें तें— ’

‘ आपल्या वडिलांशीं हितशत्रुत्व करणाऱ्या त्या चाटुय्याचा संध्येलाही राग आला. तिनें क्रुद्ध स्वरानें विचारलें, ‘ त्यानंतर ? ’

रागाला रागाची साथ मिळतांच तिच्या वडलांना उत्तेजन आलें. त्यांनीं तिच्याहूनही आवाज चढवून क्रुद्ध स्वरानें उत्तर दिलें, ‘ नंतर काय ! त्या म्हाताऱ्यानें ती औषधाची बाटली दाखवितांच त्या बेट्यानें तें सगळें औषध घटाघट पिऊन टाकलें आणि ‘ मातीचें औषध ! मी तर हें सर्वच पिऊन दाखविलें. असें माझें औषध तो पिऊन टाकतो तर पाहूं ! असें म्हणून कॅस्टर ऑईलची एक बाटली तिथें ठेवून तो निघून गेला. अर्थात् मी जातांच तो म्हातारा म्हणाला, भटजी महाराज, त्यानें तर तुमचें सगळें औषध एकदम पिऊन टाकलें ! आतां त्यानें ठेवलेलें हें औषध तुम्हीं पिऊन दाखवा तरच मी तुमचें औषध घेईन. ’

संध्या भीतिव्याकूल होऊन म्हणाली, ‘ तें औषध तुम्हीं घेतलं नाहीं ना बाबा ? ’

‘ छे: मी काय तें औषध घेतों ! पण इतकी दुपार होईपर्यंत मी घरोघर फिरलों तरी माझें औषध कुणीच घेतलें नाहीं ! ! एकही रोगी मला मिळवतां आला नाहीं. त्या पराण्याच्या नांवानें मी आतां खात्रीनें केस घालणार हें

सांगून टेवतों तुला संध्ये.'

क्षोभानें आणि अभिमानानें संध्येच्या नेत्रांतून अश्रू वाहूं लागले. जगांतील सर्व प्रकारच्या आघात अपघातांतून, उपद्रवांतून, छळ गांजणुकींतून, आणि निंदाउपहासांतून बचावण्यासाठीं याच आपल्या वडलांना दशभुजादेवीप्रमाणें सांभाळीत असतांना, अहर्निश जपत असतां त्यांना त्रास देण्यासाठीं सर्वांनीं टपून असावें ! काय ही शोचनीय अवस्था ! ! निस्वार्थ बुद्धीनें लोकसेवा करीत असतांही माझ्या बाबांना शत्रूंनीं गांजावें ना ? ती गद्दिवरून म्हणाली, ' कां बरं बाबा तुम्हीं दुपारतिपारच्या कडक उन्हांतून दुसऱ्याच्या कल्याणासाठीं फिरत असतां ! तुमच्याकडून औषध नेण्यासाठीं या वाडींतील लोक एकसारखे घरीं येऊन परत जातात. तुमच्या औषधासाठीं बिचारे दाराचे उंबरे झिजवून गेले ! "

संध्येच्या या बोलण्यांत सत्याचा थोडासा अपलाप झाला होता. खेड्यांतील गरीब गुरीब लोक औषध मागण्यासाठीं येत खरे; पण ते संध्येजवळ येत. तिच्या बापाजवळ नव्हे. बापाजवळच ती लहानसान रोगांची परिक्षा करून औषध द्यायला शिकली होती. आणि तिच्या औषधानें आजाऱ्यांना गुण पण येई. सहसा औषध फुकट जात नसे. मात्र तिच्या गुरुला—बापाला—ते यमाप्रमाणें भिऊन असत. तो घरीं नसल्याची वास्तपुस्त करूनच ते घरांत पाऊल ठेवीत. चुकून आपण मुखर्ज्ये महाशयांच्या हातांत सांपडतां कीं काय अशी त्यांना क्षणोक्षणीं भीति वाटे. संध्या हें जाणून असली तरी बापासाठीं खोटें बोलण्याला ती भ्याली नाहीं. आणि कधीं भीतही नसे. वडलांना समाधान वाटावें हाच त्यांत तिचा हेतू असे.

आतांचें हें तिचें बोलणेंही अशाच प्रकारचें होतें; पण तें ऐकतांच वडलांची धांदल उडाली. ते म्हणाले, ' काय परतून गेले ? कोण कोण ? किती होते ? केव्हांसे गेले ? कोणत्या रस्त्यानें गेले ? नांवगांव कांहीं विचारून घेतलें आहेस तरी ? '

मनांतल्या मनांत अत्यंत संकोचून संध्या म्हणाली, ' नांवगांव विचारण्याची काय जरूर बाबा ? ते आपण होऊन पुनः येतील.'

' छे. छे. तुझ्या या आळशी स्वभावापुढें मी तर अगदीं हात टेकले पोरी ! अग नांव विचारून घ्यायला तुला काय झालें होतें ? इतक्यांत मी एक फेरी करूनही आलों असतों. अगर औषधाला थोडासा उशीर लागतांच रोग

हटणें मुष्किलीचें होतें.—कांहीं सांगतां येत नाहीं—अग या वेळीं मी त्याचा आजार एका डोसांतच पार नाहींसा करून टाकला असता.'

संध्या कांहीं न बोलतां वडलांच्या आंगाला तेल लावूं लागली. कारण बोलण्यासारखें कांहीं नव्हतेंच मुळीं.

बापानें तिला पुनः विचारलें, 'केव्हां येतों म्हणून सांगून गेले ते लोक?'

'सायंकाळीं कदाचित्—'

'कदाचित्! पहा बरं केवढी अन्यायाची गोष्ट होऊन गेली ती! समज, कांहीं कारणानें वेळीं त्याला इकडे येतां आलें नाहीं तर? अग पण संध्ये, तो विपिनकडे तर जाऊन पोंचला नसेल? तो पराण हरामजादा तर या असल्या तपासावरच असतो. त्याला नाहीं ना ही बातमी कळली? छे. पोरी, माझ्याच्यानं आतां राहावत नाहीं. घरांत चणे चुरमुरे कांहींच नव्हते अगदीं? मूठ मूठ देऊन त्या लोकांना तासभर बसवून ठेवतां आलं नसतं तुला? येईल त्याला एकदम नाहीं म्हणून सागायचें. इकडे तिकडे कांहीं पहायचें नाहीं. काय म्हणावें तुझ्या या स्वभावाला? कोण आहे? कोण? कोण डोकावून पाहतं? ये असा पुढें ये बाबा! राममय का? लंगडतोस कां बाबा?'

वैद्यबुवांच्या आदरपूर्वक बोलविण्यानें व गडबडीच्या कोलाहलमय स्वागतानें, शेतकऱ्यासारखा दिसणारा एक मध्यम वयाचा माणूस पडवींत येऊन उभा राहिला. आणि अगदीं निस्पृहपणाच्या आवेशानें म्हणाला, 'नाहीं महाराजजी! कांहीं नाहीं तें—'

'कांहीं नाहीं? विलक्षण! चांगला लंगडतो आहेस! संध्ये, राहूं दे ग तें तुझं तेललावणं! कांहीं नाहीं म्हणतोस? स्पष्ट आरनिका केस दिसते आहे मला! छे–छे–थट्टा नव्हे. राममय काय कुठं आहे पाहूं तुझा पाय?'

पाय दाखविण्याची ही प्रस्तावना ऐकून राममयानें एकवार करुण नजरेनें संध्येकडे पाहिलें, आणि म्हटलें, 'जी हां. थोडासा पाय मुरडल्यामुळें काल पडलों होतों खरा.'

प्रियबाबू आपल्या मुलीकडे दृष्टिनिक्षेप करून स्मितहास्यपूर्वक म्हटलें, 'पाहिलंस संध्ये, नजर टाकतांच मी सांगितलं कीं नाहीं आरनिका म्हणून? आजाऱ्याला पहातांच माझं निदान ठरलेलं! हां. कसा काय पडलास बाबा?'

'हां जी. सांगितलं ना पाय मुरगळून पडलों म्हणून! दरवाजाजवळच पाणी जाण्यासाठीं म्हणून एक चर काढला आहे. त्या चरावर पाय ठेवण्या-

साठीं नेहेमीं एक फळी असते. मुलानें ती फळी केव्हांतरी काढून टाकली होती. माझें लक्ष्य नव्हतें—'

'हं. म्हणजे तूं मनानें अस्वस्थ होतास. ॲगनस्—एपिस्—संध्ये, बाळे, ध्यानांत ठेव. मनःस्वास्थ्य हेंच मुख्य तत्त्व. महात्मा हेरिंगनें सांगितलें आहे. हं. तुझें लक्ष्य नव्हतें. तुझें मन थाऱ्यावर नव्हतें. पुढें ?'

'पाय ठेवतांच एकदम खालीं गेला. मुरगळला आणि पडलों.

'थांब. थांब. मुरगळला असें म्हणालास नाहीं का ? अरे मुरगळणें आणि दुमडणें एक नव्हे रामा.'

'जी हां. तर मग पाय मुरगळूनच पडलों असेन.'

'हं. मन अस्वस्थ होतें. लक्ष्य नव्हतें. बोललास आणि विसरलास. विसर-भोळेपणा म्हणतात याला. ॲगनस्, एपिस. हं. पुढें ?'

'पुढें काय महाराज ! कालपासून पायांत कळ येत आहे आणि पुढें पाऊलच टाकतां येत नाहीं.'

असें म्हणून त्या शेतकऱ्यानें उत्सुकतेनें संध्येकडे पाहून एक दीर्घ सुस्कारा टाकला.

संध्या लागलीच म्हणाली, 'बाबा, आतां दुपार टळून चालली. एक डोस आरनिका—'

'ओः जरा थांब ना संध्ये, या केसचा स्टडी तरी करूं दे मला. सिरी-लिया सिमिलिबस्. अग रेमिडी सिलेक्ट करणें म्हणजे काय पोरखेळ नव्हे ! बदनाम होईल. हां. पुढें ? तुला कळ कशी व कुठून येते ? वेदना कोणत्या प्रकारच्या होतात रामा.'

'जी. हां. पाय नुसता ठणकतो आहे महाराज !'

'अहं. तसं नाहीं. तें नाहीं मी विचारीत ! वेदना कोणत्या प्रकारच्या होतात ? घांसल्यासारख्या कीं सोलल्यासारख्या ? सुई टोंचल्याप्रमाणें कीं विंचू चावल्याप्रमाणें ? कणकणतें कीं झणझणतें ?'

'जी हां महाराज. अगदीं तसेंच होतें.'

'हां. झणझणतें म्हणतोस ! ठीक. तरच. बरें पुढें ?'

'पुढें काय सांगूं आणखी महाराज. कालपासून या झणझणण्यामुळें मरतों आहे अगदीं—'

'थांब. थांब. काय म्हटलेंस ? मरतो आहेस ?'

राममय बिचारा औषधासाठीं अगदीं उतावीळ झाला होता. त्यानें म्हटलें, ' तर काय महाराज ! लंगडत तर चाललों आहे. पाय पुढें टाकवत नाहीं. हें मरण नाहीं तर काय मुखर्ज्ये महाराज ! शिवाय तीं पोरं कांहीं ऐकत नाहींत मानीत नाहींत. त्यांचा सगळा खेळ चालतो त्या एका फळीवर ! आणखीं एकाद्या वेळीं अंधारांत मी त्या चरांत पडून मरेन सुद्धां. तेव्हां काय द्यायचें असेल तें औषध द्या महाराज. पुष्कळच उशीर होऊन गेला—'

' बाबा, आर्निका दोन थेंब—'

प्रियबाबूंनीं मुलीकडे पाहून किंचित् हास्य केलें आणि नंतर म्हटलें, ' नाहीं बाळ नाहीं. ही आर्निका केस नव्हे. विपिन असता तर त्यानें हेंच औषध दिलें असतें कदाचित्. चार थेंब एकोनाईट तीस पॉवर. दोन तासांच्या अंतरानें—'

संध्येनें डोळे वासून विचारलें, ' एकोनाइट बाबा ? '

' होय. बाळे तेच बरें. मृत्युभय ! मृत्युभय ! पडून मरेन म्हणतो. सिमिलिया सिमिलेबस क्युरेन्टर. हेरिंग महात्मा म्हणतो, रोगाचें नव्हे तर रोग्याचें निदान करावें. मृत्युभयावर एकोनाइट हेंच मुख्य. विपिन असता तर ! अंः तरीही हरामजादा वैद्यकी करायला धांवतो. राममय, बाटली घेऊन जा मुलीकडून. दोन तासांच्या अंतरानें चार वेळ घे. संध्याकाळीं मी पाहायला येईन. आणि सांगून ठेवतों, पराण येईल आणि विचारील तुला ' काय दिलें आहे पाहूं ? पण दाखवूं नको समजलं काय ? बजाऊन ठेवतों. हरामजादा ती सगळी बाटली घटाघटां पिऊन टाकील आणि पुन्हां तेथें कॅस्टर आईल ठेवून जाईल. छेः माझ्या पोटांत तर सारखा मुरडा होतोय्—'

राममयाला औषध देण्यासाठीं संध्या उठली होती. ती ते शब्द ऐकून भीतिव्याकूळ नेत्रांनीं वडलांकडे पाहात म्हणाली, ' बाबा, तें कॅस्टर आईल तर सगळें पिऊन आलां नाहीं नां तुम्हीं ? '

' छेः नाहीं ग. ओः तांब्या आण बघूं लवकर—'

' तर मग मला वाटतें तुम्हीं—'

' नाहीं. नाहीं. नाहीं. लवकर तांब्या भरून आण ना ! जळल्या या घरांत कुठें कांहीं लवकर मिळेल तर शपथ ! असूं दे तुझा तो तांब्या—' असें बोलत बोलत प्रियबाबू दिंडी दरवाजानें बाहेर पडले आणि वर तोंड करून धांवत सुटले.

राममय म्हणाला, ‘ आक्कातार्ई, तेवढें औषध—’

संध्या चकित होऊन त्याच्याकडे पहात म्हणाली, ‘ औषध? होय आणून देतें हं.’

‘ आक्कातार्ई, तूं काय म्हटलेंस तें आर्निका ना. तेंच औषध दोन थेंब मला दे. मुखर्य्ये महाराजांचें औषध न देशील तर बरें—’

संध्येला वाईट वाटलें. ती खिन्नतेनें म्हणाली, ‘ मी काय बाबांपेक्षां जास्त चांगलें औषध जाणतें होय राममय? ’

राममय संकोचून म्हणाला, ‘ नाहीं. तसें नाहीं. पण त्यांचें औषध फारच कडक असतें कीं नाहीं म्हणून म्हटलें. मी अशक्त रोगी माणूस. शिवाय गेल्याबरोबर माझ्या मागें कामेंही आहेत. जातांच मी शेजारच्या माधवाला सांगून सवरून पाठवितों. कालपासून त्यांचें पोट दुखत आहे. तेव्हां त्याला वैद्यदादांचें औषध अवश्य द्या. मला मात्र आतां तुम्हींच काय सांगितलें तें द्या म्हणजे झालें.’

संध्या कांहींशा विषण्ण चेहऱ्यानें त्याला म्हणाली, ‘ बरं तर ये इकडे ’ असें म्हणून ती राममय म्हाताऱ्याला घेऊन ओसरीवरून बाजूच्या खोलींत गेली.

देवपूजेसाठीं एक घागरभर पाणी आणावें म्हणून जगद्धात्री तळीवर गेली होती. ती तितक्यांत आली आणि भरलेली घागर पायरीवरच दणकन आदळून क्रोधकर्कश स्वरानें ‘ संध्ये? ’ म्हणून हांका मारूं लागली.

संध्येनें खोलींतूनच उत्तर दिलें ‘ आलें हं आई! ’

आई म्हणाली, ‘ तुझे वडील अजून आले नाहींत वाटतं! मला वाटतें आज देवपूजा राहिलीच.’

मुलगी खोलींतून बाहेर येऊन म्हणाली, ‘ बाबांना येऊन बराच वेळ झाला आई, तेल घालून नुकतेच ते स्नानाला गेले आहेत.’

‘ कुठं? तळीवर कांहीं मला दिसले नाहींत! ’

ते कुठें धांवतपळत गेले हें संध्येला चांगलें माहीत होतें. ती थोडा वेळ स्तब्ध राहून म्हणाली, ‘ तर मग मला वाटतं ते नदीवर गेले असतील. आतांच येतों म्हणाले पण बराच वेळ झाला. ’

जगद्धात्रीचें कांहीं तेवढ्यानें समाधान झालें नाहीं आणि तिचा रागही शांत झाला नाहीं. उलट मुलीच्या त्या उत्तरानें ती ज्यास्त उत्तेजित होऊन म्हणाली, ‘ यांच्याबरोबर दिवस काढणं मला आतां अगदीं अशक्य होत

चाललं आहे संध्ये. एक यांनीं तरी घराबाहेर व्हावं नाहीं तर मी तरी तोंड घेऊन कुठं तरी जातें. पुनः पुनः सांगितलं आज कांहीं पूजा करायला भटजी येणार नाहींत तेव्हां लवकर घरीं यावं. तर हा वेळ झाला. देवाच्या डोकीवर कांहीं आज पाणी पडत नाहीं. तसंच काल रात्रीं काय करून आले आहेत तुला माहीत आहे? विराट न्हाव्याचे सगळे व्याजाचे रुपये सूट म्हणून देऊन त्याला पावतीसुद्धां देऊन बसले.'

संध्येनें साशंकीत स्वरानें विचारलें, 'आई, तुला हें कुणीं सांगितलं?'

'कां? विराटची बहीणच आतां बोलली. भावजयीला घेऊन नदीवर न्हाण्यासाठीं म्हणून आली होती.'

किंचित् हंसण्याचा प्रयत्न करून संध्या म्हणाली, 'अग त्या बहीण भावांत चांगलंच भांडण आहे. कदाचित् तिनं तें खोटंच सांगितलं असेल.'

आई रागावून म्हणाली, 'प्रत्येक गोष्टीची तूं अशी सारवासारव कशाला करतेस संध्ये? सांग पाहूं. ताप आला आहे म्हणून सांगून विराट न्हाव्यानं यांना बोलावून नेलं, औषध घेतलं, धन्वंतरी म्हणून पायधूळ कपाळाला लाविली, जमिदार म्हणून गौरीसेन म्हणून खूप स्तुती केली...हें सगळं सांगून त्या दोघी लोटपोट होऊन हंसत होत्या. खोटं म्हणतेस तूं हें? रुपये जाऊं देत. मग मनांत आलं ही घागर भरून न नेतां अशीच गळ्यांत बांधावी आणि तळींच जीव द्यावा! आज काल अगदींच वाह्यात व्हायचं झालं आहे संध्ये! अशानं मी हा घरसंसार चालवावा तरी कसा सांग पाहूं?'

'किती रुपये होते आई?'

'किती? दहाबारापेक्षां खात्रीनं कमी नाहींत सांगून ठेवतें. हे मूठभर रुपये आपले अगदीं न विचार करतां—'

तिचें वाक्य कांहीं पुरें झालें नाहीं. तोंच प्रियबाबू ओलेत्यानेंच गडबडीनें घरांत येतां येतां ओरडून म्हणाले, 'संध्ये, टॉवेल टॉवेल टॉवेल दे एकदां इकडे. एकोनाईट तीस पॉवर. पेटींत अगदीं कोंपऱ्याच्या बाजूला—'

जगद्धात्री अग्निप्रलयाप्रमाणें अगदीं एकदम भडकून म्हणाली, 'एको-नाइट आणतें हं मी! सासऱ्याच्या अन्नावर जमीनदाराचा डौल आणायला लाज नाहीं वाटत? विराट न्हाव्याला व्याजाची सूट द्यायला कुणी सांगितलं? कुणाच्या जागेंत तुम्हीं हाडी-दुले लोकांना आणून ठेवतां? कुरण म्हणून गायचराई म्हणून तुम्हीं कुणाची जमीन दान करतां? तुम्हीं अगदीं एक-

सारखें माझें हाडमांस जाळून पोळून खात आहां! सांगून ठेवतें, आज मी तरी एक निघून जातें, नाहींतर तुम्ही तरी या घरांतून बाहेर पडा.'

संध्या कांहींशा तीक्ष्ण स्वरानें म्हणाली, 'आई, दुपारतिपारीं हें सगळं काय चालविलं आहेस तूं?'

आईनें त्याच चढत्या सुरांत जबाब दिला, 'याला आणखीं दुपार-सकाळ कसली! देवपूजा झाली कीं चुलीवरची कोळसे राख काय असेल ती गिळतील आणि हात धुतां धुतां बाहेर निघून जातील! आजवर मी पुष्कळ सहन केलं. आतां माझ्याच्यानं हें नाहीं सहन होत. सहन होत नाहीं. नाहींच सहन करवत—'

बोलतां बोलतां अकस्मात जगद्धात्री हुंदके देऊन रडूं लागली आणि तशीच रडत रडत घाईघाईनें स्वयंपाक घरांत निघून गेली.

प्रियबाबूंनीं 'हं:' म्हणून एक दीर्घ सुस्कारा सोडला. आणि म्हटलें, 'अग, जमीनदार म्हणून इतके रुपये मी त्या विराटाला थोडेच सोडले?' म्हणतेस काय तूं? पण ऐकतो कोण कुणाचें? आणि यांत तिचा अगर त्याचा तरी दोष काय? औषध घ्यायचं. पथ्याची तयारी कांहींच नाहीं. म्हटलं पथ्यापाण्यासाटीं. पण बोलून काय? नेट्रम दोन पॉवर एक थेंब देऊन—'

संध्येच्या दोन्हीं नेत्रांतून टप टप अश्रू वाहूं लागले. कुणाला दिसूं न देतां पदरानें आपले डोळे पुसून ती म्हणाली, 'बाबा, तुम्हीं आईला विचारल्याशिवाय या भानगडींत कां पडलां?'

'नाहीं ग. मी कशाला पडूं. पण प्रिय मुखय्यावांचून या गांवांत कांहींच होण्याचा रंग नाहीं. तेव्हां पहाणें भाग पडतें. कुठें कुणाला काय रोग झाला आहे, कुठें कुणाला—'

बोलणें पुरें होऊं न देतांच संध्या आंत निघून गेली, आणि टॉवेलसह सोवळें धोतर आणून वडलांच्या हातीं देत ती म्हणाली, 'आतां उशीर करूं नका बाबा. देवपूजा आटोपून टाका. मी ही आलेंच.

इतकें सांगून संध्या आपल्या खोलींत निघून गेली. प्रियबाबूही टॉवेलनें डोकें पुशीत पुशीत बहुधा पूजा करण्यासाठीं देवघराकडे निघाले. जातां जातां त्याचें तोंड चाललेंच होतें. 'अं: पुन: पोटांत कळ येऊं लागली वाटतं. त्या पराण्याच्या नांवानें—अं:—काय हें—पोटांत—अं:'

* * *

## ३

त्या दिवशीं संध्येला आपला चांगला दरारा वाटावा म्हणून, भीति दाखवावी म्हणून रासमणीनें ज्या गोलोक चाटुर्य्यांचा वारंवार उल्लेख केला व ज्याच्या दराऱ्यामुळें गाई आणि वाघ एकत्र एका घाटावर पाणी पितात असें बजाऊन सांगितलें ती हिंदुकुल चूडामणी पराक्रमी व्यक्ति म्हणजे गोलोक महाराज नुकतेच आपल्या बैठकीच्या जागीं येऊन बसले होते. त्यांचा तो नेसलेला पितांबर आणि शेंडींत खोंवलेलें ताजें करबीपुष्प पाहून तर नुकतीच प्रातःकालिन पूजा व आन्हिक आटोपून स्वारी बाहेर आली असावी असाच कोणाचाही समज झाला असता. बाहेरून भेटीला येणारीं माणसें अजून हजर झालीं नव्हतीं. हुक्का भरून व त्याला नळी लावून ठेवून नेहमीचा नोकर नुकताच बाहेर गेला होता. आणि आपल्या सुगोल उदराला मागच्या बाजूनें लंबगोल तक्क्यानें टेकण देऊन अस्वस्थ मनस्थितीनें ते त्या हुक्क्याचा आस्वाद घेण्याच्या तयारींत होते तोंच अन्तर्गृहाकडचा दरवाजा वाजल्याचा त्यांना आवाज ऐकूं आला आणि त्या आवाजाच्या अनुरोधानें आपले डोळे उंचावून त्यांनीं विचारलें, ‘ कोण ? ’

आंतून उत्तर आलें. ‘ मी. कांहीं न खातांच अगदीं आलांत एकदम ! राग आला वाटतं ? ’

गोलोक म्हणाले, ‘ राग ? नाहीं. आतां राग रुसवा कुणावर करायचा सांग बरं ! तुझ्या वडील बहीणी बरोबरच तो निघून गेला ’ शब्दांबरोबरच दीर्घ निश्वासाचा एक सुस्कारा सोडून ते पुढें म्हणाले, ‘ नाहीं. यावेळीं आणखीं कांहीं खायचं नाहीं मला. आज गोकुळचा देव निजधामाला गेला ! तेव्हां सूर्य मावळल्यावर संध्या आन्हिक आटोपून दूध आणि गंगाजल थोडेंसें घेईन. असे दिवस कसे आणि किती जाणार आहेत देव जाणे ? ’ शेवटीं त्यांनीं पुनः एक सुस्कारा सोडला आणि हुक्क्याची नळी तोंडाला लाविली.

नेपथ्यांतून जी स्त्री बोलत होती तिनें तो दरवाजा किंचित् उघडून बाहेर कोणी आहे कीं नाहीं तें पाहिलें आणि हळूच बाहेर बैठकीच्या जागीं पाऊल टाकलें. ती एक विधवा होती. दिसण्यांत कांहीं कुरूप नव्हती. वयही बहुतेक पंचवीस सव्वीसाच्या आंत असावें ! चांगलें तलम असें शुभ्रवस्त्र ती नेसली होती. हातांत तसा कांहीं दागिना नव्हता. ते मोकळेच होते. पण गळ्यांत मात्र इष्टकवच असलेला एक चांगला जाडजूड सोन्याचा हार होता.

गोलोक महाशयांच्या त्या बोलण्यावर ती श्वेतवसना विधवा सुन्दरी किंचित् हंसून म्हणाली, 'सर्व कांहीं आपण थट्टेवर नेतां! पण लोकांना काय वाटेल सांगा ना? शिवाय मला सासरीं परतून जायला मुळीं नकोच का?' नंतर लागलीच विषण्ण चेहरा करून ती म्हणाली, 'ज्यांची सेवा करण्यासाठीं मी जन्माला आलें ते तर मला फसवून केव्हांच निघून गेले. पण आतां त्याच घरीं परत जाऊन म्हाताऱ्या सासूसासऱ्याची मला सेवा शुश्रुषा करायला नको का? आपणच सांगा ना?'

तंबाकू झुरके घेतां घेतां गोलोक महाशय गंभीर मुद्रेनें म्हणाले, 'तें खरेंच आहे. माझा संसार मातींत बसला म्हणून दुसऱ्या कुटुंबांतील स्त्रीला इथं ठेवून घेणं योग्य नाहीं. आणि या वयांत घरची लक्ष्मी तरी मला सोडून कां गेली असती? सत्तेचं गेलं मग मिनतवारीचं कसं राहाणार? मधुसूदन— मधुसूदन! बरं. जा तर एकादा चांगलासा दिवस पाहून. बहिणीची शुश्रुषा करायला आलीस पण ती कांहीं तुला लाभली नाहीं. सेवा करून घेतली आणि गेली बिचारी! गांवात नांव ठेवून गेली. सोनं झालं तिचं!'

ज्ञानदा—त्या विधवा तरुणीचें नांव—यावर काय बोलणार! ती स्तब्धच राहिली. गोलोक महाशय हातरुमालाच्या टोंकानें डोळे पुसून कांहीं मिनिटें निःशब्दपणानें तंबाखूचे झुरके घेत राहिले आणि नंतर जडस्वरानें म्हणाले, 'सती लक्ष्मी होती. तिचे दिवस संपले. निघून गेली. त्यासाठीं आतां नाहीं मी दुःख करीत. पण संसार उजाड झाला. मुली चांगल्या कर्त्या-सवरत्या आहेत. त्या आपलीं मुलंबाळं सांभाळून नवऱ्याचीं आणि सासुसासऱ्याची सेवा करण्यांत गढून गेल्यामुळें त्यांचीही मला काळजी नाहीं पण पोरगा मात्र उघडा पडला. त्याला पहायला कोणी नाहीं!!'

ज्ञानदा गहिंवरून म्हणाली, 'इडा पिडा टळो आणि बाळाचं कल्याण होवो. तो कां उघडा पडेल? आपण तसं कां म्हणतां?'

गोलोकनें वर मान करून तिच्याकडे पाहिलें आणि खिन्नतेनें हंसून म्हटलें, 'म्हणू नये खरं पण डोळ्यांपुढं सर्व कांहीं उघड उघड दिसत आहे ना? मधुसूदन! तूंच एक सत्य!! घर संसारांत मन लागत नाहीं. कार्यव्यवहारही विषाप्रमाणें त्याज्य वाटतो. आयुष्याचे राहिलेले दिवस, व्रत उपवास करण्यांत आणि मधुसूदनाचें नामस्मरण करण्यांत निघून जातील. त्याबद्दल नाहीं मला विशेष वाटत! एक वेळ घांसभर मिळालें तर उत्तमच. न मिळालें तर

हरकत नाहीं. पण अहर्निश काळजी वाटते ती बाळाची. त्या अर्भकाचें कसें होईल, हाच विचार ! मधुसूदन !! आतां तुझाच काय तो आसरा !'

ज्ञानदाचे दोन्हीं डोळे अश्रूंनीं भरून आले. गोलोकची पत्नी ही तिची मामेबहीण असली तरी सख्ख्या बहिणीप्रमाणें त्या दोघींचें एकमेकांवर प्रेम होतें. त्यामुळें अखेरच्या दुखण्यांत तिनें ज्ञानदाला बोलाविलें आणि तिच्यानेंही आल्यावांचून राहवलें नाहीं. ती तिची आक्का आतां मरून गेली. महिन्यापेक्षां जास्त दिवस होऊन गेले. पण मरतांना तिनें आपल्या नऊ दहा वर्षांच्या मुलाला या तरूण विधवा बहिणीच्या स्वाधीन केलें. तूंच आतां याची आई आहेस असें सांगितलें. ती बोलली आणि निघून गेली; पण आज प्रश्न पडला जबाबदारीचा.

ज्ञानदा करुण स्वरानें म्हणाली, 'पण मला तर इथं असं कायमचं राहातां येत नाहीं हें आपण जाणतांच. शिवाय लोक तरी काय म्हणतील सांगा पाहूं ?'

दोन्ही डोळे वटारून गोलोक म्हणाला, 'लोक तुला नांवें ठेवणार ? या गांवांत राहून ? या पंचक्रोशींत त्यांना राहायचं नाहीं वाटतं !' यापेक्षां जास्त शब्द त्याच्या तोंडून बाहेर येत ना. आणि जास्त शब्द उच्चारण्याचें कारणही नव्हतें.

ज्ञानदा स्वतः हें जाणून होती. आणि यामुळेंच त्यावर ती कांहीं बोलली नाहीं.

गोलोक पुढें बोलूं लागले. ते म्हणाले, 'अग, माझ्या शब्दाला मान न दिला तर त्या माणसाला या भागांत कुठेंही कोणी थारा देणार नाहीं. या गांवांत तर नाहींच नाहीं. मला त्याबद्दल मुळींच काळजी नाहीं. काळजी वाटते मुलाची. तुझा त्याला अतिशय लळा लागला आहे. तिनेंही मरतांना तुझ्यावर विश्वासून त्याला तुझ्या हातीं सोंपविलें आहे. माझ्यावर कांहीं तिनें तो भार टाकला नाहीं.'

ज्ञानदा मोठ्या दुःखानें आपले अश्रू आवरून म्हणाली, 'सगळं कांहीं मला कळतं आणि समजतंही. पण माझा म्हातारा सासूसासरा अजून जिवंत आहेत ना ? माझ्यावांचून त्यांना दुसरं कोण आहे बरं ?'

उपहासपूर्ण स्वरानें गोलोकनें म्हटलें, 'खरंच कोणी नाहीं. तूं अगदीं अशी कशी ग ! आतां मुखय्ये महाशय—तुझा नवरा—असता तर गोष्ट वेगळी; पण तूं तर त्याला चांगलंसं पाहिलंसही नाहीं. तेरावे वर्षीं तूं विधवा झालीस—'

'विधवा झालें म्हणून काय झालं हो.' सासूसासरा जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत मला त्यांची सेवा चाकरी केलीच पाहिजे.'

तिचें तें निर्धाराचें बोलणें ऐकून गोलोक क्षणभर स्तब्धच राहिले. नंतर गंभीरतापूर्ण असा एक सुस्कारा सोडून म्हणाले, 'तर मग जा बाई माझा संसार वाऱ्यावर टाकून ! पण एका गोष्टीचा विचार कर. तूं माझी घरधनीण नसलीस तरी तिची बहीण आहेस. नात्यानं तिची—'

ज्ञानदा कांहींसा रागाचा आविर्भाव आणून म्हणाली, 'असं कांहीं बोलायचं नाहीं म्हणून सांगितलं ना ? आधींच लोक नसतं नातं जोडून थट्टा मसकरी करतात. मेहुणी म्हणजे कांहीं तरी म्हणतात. माझं नांव घेऊन बोला-यला आपल्याला काय हरकत आहे ?'

गोलोक प्रफुल्लित चेहऱ्यानें म्हणाला, 'करीत ना थट्टा ! तूं काय माझी मेहुणी नाहींस ? अग मेहुणी म्हणजे कोण हें काय सांगायला पाहिजे ? त्या नात्यानं ते थट्टा मस्करी करणारच.'

ज्ञानदेलाही पटकन हंसू आलें पण लागली ती गंभीरतेनें म्हणाली, 'तें कांहीं नाहीं. आपण मला नांवानंच हाक मारली पाहिजे अगदीं नेहमी बरं का ! विसरायचं नाहीं.'

गोलोकनें मान्यता दिली, 'बरं बरं. तसंच करीन हं.' पण हे शब्द बोलतां बोलतां त्यांचा दाढी मिशी विरहीत असलेला चेहरा खिन्नतेनें व्यापून गेला. हळू हळू गुदमरलेल्या अन्तःकरणांतून सुस्कारे निघूं लागले. आणि निश्वास सोडतां सोडतां कांहींसें स्वतःशींच त्यानीं बोलण्याला आरंभ केला. 'अंतःकरणांत कसा रात्रंदिवस हाहाकार चालला आहे ! हायरे देवा ! त्यांत आणखीं लोकांनीं मला हंसावें, माझी आणखी थट्टा करावी !! काय हें जन्माचें विडंबन !! तरी मधुन मधुन—पण जाऊं द्या. न बोललेंलेंच बरें ! आयुष्यांत कुणाला दुखविलें नाहीं, कोणाचा असंतोष केला नाहीं. आणि जें केलें नाहीं तें मी आज तरी कां करूं ? विषय हा विषासमान आहे. संसार हेंही वीषच. तुझ्या चरणकमलीं केव्हां एकदां कायमचा आश्रय मिळेल बरें मधुसूदन !'

ज्ञानदा भरल्या डोळयांतील तरळत्या अश्रूंनीं अगदीं स्तब्ध राहून त्या विलापाकडे पाहात होती. विधुराचा तो विलाप पहातां पहातां तिच्या डोळयांची पातींही मिटतना. गोलोकचें आत्मगत भाषण चालूच होतें. 'आधींच हृदय

जळत आहे त्यांत आणखी ज्वाळा उफाळून येतात. जखमेवर मीठ घातल्या-सारखेंच होत आहे. रात्रंदिवस मध्यस्थांचे हेलपाटे सुरू आहेतच. म्हणतात सगळें माहीत आहे. आणि मी लपविणार तरी काय ? लपवाछपवी कशी करावी हें मुळीं मला माहीतच नाहीं कधीं? संधीसाधू मुलीचे पालक मध्यस्था-मार्फत सांगतात, 'तुमचें सगळें खरें पण कुलीनांचे कूल कुलीनांनींच राखलें पाहिजे. यावेळीं माघार घेऊन कसें चालेल ? सगळें पाहातच आहों. शोक संतापानें अकालीं केंस पिकलेले दिसतात हें काय आम्हाला माहीत नाहीं. व्याप तितका संताप असायचाच ! केंस पिकले म्हणून काय झालें ? ते पक्के आणि ताठर आहेतच कीं नाहीं ! ! अशा या बोलण्याला काय उत्तर द्यायचें ? आतां या वयांत मी आणखी विवाह करावा ? आणखीं एका नव्या बंधनांत मान अडकविणें मला शोभतें ? मानवेल तें मला ? तूंच सांग ना—'

नीरसतेनें हंसून ज्ञानदा म्हणाली, 'त्यांत काय वाईट आहे ? करावं ना आणखीं एक लग्न !'

गोलोक बोलला, 'अग तुला वेड तर नाहीं लागलं ? पुनः लग्न करूं ? अग तुझ्यासारखी लक्ष्मी, गतपत्नी सारखीच तिची बहीण ज्याच्या घरांत आहे, कांहीं म्हण पण ती काय आपल्या बहिणीच्या मुलाला विशेषतः मरतांना तिनें विश्वासानें स्वाधीन केलेल्या मुलाला—वाऱ्यावर सोडून निघून जाईल ? छे. तिच्यानें जाववणार नाहीं. तिचे मरतांनाचे बोल तुला मानलेच पाहिजेत. माझा काय त्याच्याशीं संबंध ! तुझाच आहे तो मुलगा ! कोण आहे रे ?'

बाहेर उभ्या असलेल्या नोकरानें हळूच आंत डोकावून उत्तर दिलें, 'चोंगदार महाशय आले आहेत.'

चेहरा विकृत करून गोलोक म्हणाले, 'छेः नाहीं आतां हें सहन होत ! एकसारखें काम काम. व्यवहार आणि पैसा. विषयावांचून नांव नाहीं. माझ्या सगळ्या संसाराला विषबाधा झाली आहे हें कोण पहातो ? मी समजाऊं तरी कुणाला आणि समजणार तरी कोण ? मधुसूदना, केव्हां रे बाबा यांतून मला मुक्त करणार ? जा. उभा काय राहिलास. बोलीव त्याला आंत.'

नोकर निघून जातांच ज्ञानदाही अन्तर्गृहांतील दरवाजा आड होऊन हलक्या स्वरानें म्हणाली, 'म्हटलं, दुपार टळल्यावर थोडा फराळ करायचा होईल ना ?'

गोकुल महाशय मान हालवून म्हणाले, 'नाहीं. गोकुळच्या देवाची निर्वाणाची तीथी आहे आज. आजचा दिवस एखाद्या पर्वासारखा पाळायचा. अग, माझ्यासारखीं त्या काळचीं माणसें अजूनही हें सर्व मानतात म्हणून चंद्रसूर्यांचा उदय होतो बरं आकाशांत. नदीसागराला भरतीसुकती येते ती याच पुण्याईनं! मधुसूदना, तुझी इच्छा बाबा.'

ज्ञानदा म्हणाली, 'तें कांहीं असलें तरी दूध घेण्याला कांहीं हरकत नाहीं. गंगाजलासारखंच पवित्र गोक्षीर आहे तें. व्रतपार्वण्याला चालतं. थोडे लवकरच या आंत. मी वाट पहात बसतें.' असें म्हणून तिनें अन्तर्गृहाचा दरवाजा बंद करून घेतला.

आणि समोरच्या दरवाजांतून नोकरा मागोमाग एक सभ्यसा दिसणारा गृहस्थ आंत आला. त्यांचें स्वागत करून गोलोक महाशय म्हणाले, 'या चोंगदार. बसा. गृहस्था, काळजीनें माझा जीव सुकला? काय झालें तेंही तुम्हीं मला कळवूं नये? भूलो, जा. शूद्रांच्याकरितां ठेवलेल्या गुडगुडींत पाणी घालून आणि तंबाकूची चिलीम ठेवून आण.'

विष्णू चोंगदारानें प्रणामपूर्वक गोलोक महाशयाची पायधूळ कपाळाला लाविली आणि बैठकीवर एका बाजूला बसून त्यानें प्रथम एक निश्वास सोडला. नंतर म्हणाला, 'महाराज, सुस्कारा सोडायला वेळ मिळेना मग कळवायचें काय बोलतां? जाऊं द्या. पांचशें आणि तीनशें आठशें गलबता-वर चढवून हा आतां आलों. धांदल, गडबड मारपीट काय होते तें कांहीं पुसूं नका साहेब!'

प्रकार असा होता, दक्षिण आफ्रिकेकडे बोकड आणि बकरे रवाना करण्याचें जें गुप्त कंत्राट घेतलें होतें त्याचा भागीदार होता हा विष्णू चोंगदार. तीन महिन्यांत तीन हजार प्राणी जमवून द्यायचे, या अटीवर या बाबतींत लेखी करारमदार झाले होते. त्यामुळें चोंगदारानें आठशेंची सांगि-तलेली ही संख्या ऐकून गोलोक भट्ट महाशय फारसे खूप झाले नाहींत. ते अप्रसन्न चेहऱ्यानें म्हणाले, 'एकंदर आठशेंच? अरे मक्ता तर आहे तीन हजारांचा! अजून पुष्कळ बाकी आहे म्हणायची!'

चोंगदार कांहींसा क्षुब्ध होऊन म्हणाला, 'बोकड बकरे काय पाहिजे तितके मिळत आहेत? मालकसाहेब, ज्याच्या त्याच्याकडून एकसारखी त्याचीच निर्यात होत आहे! हे आठशें मिळवायलाच माझे प्राण कासावीस

झाले!! तरीपण हरेननें रामपूरहून पत्र पाठविलें आहे कीं, आठ दहा दिवसांत आणखी सात आठशें माल रेल्वेनें रवना करतों. फक्त ते उतरून घेऊन गलबतावर चढवायचे म्हणजे झाले. तीन महिन्यांची मुदत तर आहेना! होऊन जाईल काम फत्ते नारायणाच्या इच्छेनें!'

या आश्वासानें गोलोक भट्टाचार्यांचें समाधान होऊन ते म्हणाले, 'तुझ्यावरच सगळा भरंवसा माझा! कारण मीं तर आतां एकप्रकारें गृहस्थाश्रमांतील संन्याशीच होऊन बसलों आहे म्हटलें तरी चालेल. घरधनणींच्या मृत्यूनंतर पैसा अडका व्यापारटोपार सगळा विषवत् वाटूं लागला आहे. केवळ या एकस्या अर्भक मुलासाठीं काय करायचें तें पण मला नाहीं वाटत त्यांच्या आयुष्यांत त्याला कांहीं कमी पडेलसें!'

चोंगदार मान डोलवीत म्हणाला, 'खात्रीनें, खात्रीनें कमी पडणार नाहीं. मात्र यावेळीं अहमदसाहेब रुपयांचा ढीग पाडणार बघा. सातशांचे काँट्राक्ट मिळविलें आहे बेटयानें. आणखीही जास्त घेतलें असतें पण भांडवलाच्या अभावामुळें त्याच्यानें साहस करवेना.'

नेत्रसंकेत करून गोलोकनें विचारलें, 'हें पुष्कळ झालें होय?' 'नाहींतर काय? तसें नसतें तर मी सोडला असता हा सौदा!'

उजव्या हाताचा तळवा तोंडासमोर आणून गोलोकनें म्हटलें, 'दुर्गा दुर्गा! राम राम! सकाळीं उठल्याबरोबर या असल्या गोष्टी बोलणें तरी चांगलें का चोंगदार? जातीनें म्लेंछ. धर्माधर्माची चाड नाहीं. ज्ञान नाहीं. तरीपण दहाएक हजार मारील म्हणतोस या सौद्यांत?'

'जास्त पण कमी नाहीं' चोंगदार जोरानें म्हणाला.

गोलोकनें म्हटलें, 'लढाई जास्त दिवस चालली तर बेटा लाल बनून जाईल! खरेंच तें!'

चोंगदारानें जबाब दिला, 'यांत संशयच नको. तरी जास्त रुपयांचा खेळ आहे हा! एकदम रक्कम उभी राहिली तर बरें.'

'अरे मक्ता पाहून तो कर्ज काढील! कठीण काय त्यांत!'

चोंगदार मस्तक डोलवीत म्हणाला, 'खरें तें; पण मिळाले पाहिजेत ना! मला तसें तो बोलला होता.'

शेवटचें वाक्य ऐकून गोलोक महाराजांचे डोळे उत्सुकतेनें चमकले. त्यांनीं विचारलें, 'बोलला होता म्हणतोस? व्याज काय देईन म्हणतो?'

चोंगदारानें उत्तर दिलें, ‘ चार पैसे तर आहे; पण कदाचित्—’

पण ‘ कदाचित् ’ हा शब्द गोलोक भटजींनीं पुरा होऊं दिला नाहीं. ते रागानें म्हणाले, ‘ चार पैसे? अरे रुपायाला रुपाया मिळविणार तो आणि व्याजाच्या बाबतींत चार पैशांची भाषा! अरे दहा आणे सहा आणे असें कांहीं म्हण ना. वाटलं तर माझी भेट घे म्हणावं एकदां!’

चोंगदाराला आश्चर्य वाटून त्यानें विचारलें, ‘ रुपये आपण देणार वाटतें त्या साहेबाला ? पण ही गोष्ट घट्कर्णी झाली तर—’

एका क्षणांतच गोलोक महाराजांना आपण उतावीळपणा केल्याचें ध्यानांत आलें आणि लागलीच ते सावध होऊन व नीरस हास्य करून आपण जणुं काय त्या गांवचेच नव्हत अशा आविर्भावानें म्हणाले, ‘ राधा माधव! तुला वेड लागलें आहे चोंगदार! शिवाय शक्य तर मी अशा गोष्टीचा निषेधच करीन. आणि तसं पाहिलं तर तुझ्या माझ्याशिवाय ही गोष्ट माहीत तरी कुणाला आहे? जाणणाऱ्यामध्यें काय तो तूं आणि मी! बरें, दुसरी गोष्ट. तो कर्जाऊ पैसे घेणार मग त्या घेतलेल्या पैशांतून त्यानें बापाचें श्राद्ध केलें, नायकिणी नाचविल्या कीं जनावरांची निर्यात केली तें कोण जाणतो? आणि सावकाराला तें पहाण्याचें कारणच काय?’ अशा प्रकारें समर्थन करून समाजधुरीण पंडितवर्ग गोलोकनीं एकवार चोंगदाराकडे पाहिलें आणि आपलें म्हणणें त्याला पटलें आहे असें जाणून त्याच्या उत्तराची क्षणभर वाट पाहिली आणि नंतर स्वतःच म्हटलें, ‘ तसं नव्हे चोंगदार, एक आपली जगराहाटी सांगितली तुला. इतकं खोल जाऊन सावकाराची सावकारी चालत नसते. आतां मला तर तूं कायमचा पहात आहेसच. ब्राह्मणाचा मुलगा मी धर्ममार्गानें जाऊन भिक्षेवर राहावें लागलें तरी चालेल. तेंच भाग्य मानीन असा माझा रिवाज. अधर्माच्या पैशाला कधीं जन्मांत स्पर्श करणार नाहीं. आणि त्या परमेश्वराच्या पदकमलीं लक्ष ठेवून आहें म्हणूनच आज पांच गांवांत समाजाचा धुरीण पुढारी म्हणून धर्मवीर म्हणून मला मानतात. आज मी तोंडच्या एकदां शब्दानें ब्राह्मणाला शूद्र आणि शूद्राला ब्राह्मण करूं शकेन. जातींत घेणें आणि जातिबहिष्कृत करणें हा नुसता माझ्या हातचा मळ आहे. मधुसूदन! तुझाच मला आधार रे बाबा! मागें एकदां आजारी पडलों होतों त्यावेळीं गोपाळ डॉक्टर म्हणाला, ‘ तुम्हांला सोड्याच्या पाण्यावर राहिलेंच पाहिजे.’ मी म्हटलें,

‘ डॉक्टर, जन्माला आला त्याला मरण हें आहेच. त्यांत विशेष तें काय ! पण गोलोक भट्टाचार्याला असलें भलतेंच कांहीं करायला सांगू नका. तें कानांनीं ऐकणेंही मला पाप आहे. केनारायाचा पुत्र, हरेराम चाटुय्याचा पौत्र–ज्याच्या एक थेंब पादोदकासाठीं स्वतः भाडाहॉटीच्या राजालाही पालखी मेणा पाठवून अजीजी करावें लागत होतें तो मी गोलोक भट्टाचार्य पंचक्रोशीचा समाजाधिकारी—’

चोंगदारानें वर उठून दोनदां नमस्कार केला आणि उभा राहून म्हटलें, ‘ हें कोण नाकबूल करतील सांगा पाहूं. ही गोष्ट तर सगळें जग जाणत आहे !’

गोलोक महाशयांनीं उत्तरादाखल फक्त एक निःश्वास सोडला आणि म्हटलें, ‘ मधुसूदन, तुझाच एक आधार आहे ! ’

चोंगदार जायला निघालेला पाहून तितक्यांत त्यांनीं त्याला हाक मारली आणि म्हटलें, ‘ हें पहा, हरेनकडून आल्यावर तेवढी रेल्वेरिसीट एकदा पहा बरं. ’

चोंगदारनें संमतिदाखल मान डोलवून ‘ जी हां ’ म्हटलें. ’

गोलोक पुढें म्हणाले, ‘ तर मग आठशें आणि पांचशें झाले. बाकी राहिली सतराशें. तीन महिन्याचा अवकाश आहे म्हणा. होऊन जाईल. कसं ? ’

चोंगदार बोलले, ‘ जी–होऊन जाईल तर काय ! आहे काय त्यांत ! ’

गोलोक म्हणाले, ‘ म्हणून तुला त्यावेळींच बोलून टाकलें होतें चोंगदार कीं एकाच सवालांत एकदम पुऱ्या पांच हजारांचें कंत्राट घे म्हणून ! पण त्या वेळीं तुला तेवढें धाडस झालें नाहीं—’

चोंगदारनें उत्तर दिलें, ‘ जी. इतके सगळे बकरे मेंढे एकदम नाहीं जमले असते तर—’

‘ गोलोक महाशयांनीं त्याच्या म्हणण्याला विरोध न करतां म्हटलें, ‘ तें चांगलं केलंस. उत्तमच झालें तें. अरे धर्मानें वागून एकाच्या जागीं अर्धा, अर्ध्याच्या जागीं पाव जरी मिळाला तरी उत्तम. पण अधर्मानें मोहोर मिळाली तरी उपयोगी नाहीं. समजलं ना चोंगदार ? मधुसूदन ! तूंच एक आधार ! ! ’

यानंतर आणखीं कांहीं न बोलतां चोंगदार निघून गेला. आणि तो गेल्यावर भवद्भक्त गृहस्थ संन्यासी चाटुय्ये महाशय अर्धवट जळलेल्या हुक्क्याची नळी तोंडाला लावून विचारमग्न मुद्रेनें तंबाखू ओढूं लागले.

जणुं काय व्यवहार आणि पैसाअडका हें विषयकर्म त्यांना विषवत् त्याज्य वाटूं लागलें असावें. पण त्याच वेळीं अन्तर्गृहाचा दरवाजा किंचित् उघडून दासीनें हळूच तोंड दाखविलें आणि म्हटलें, 'एकदां आंत येऊन जावं असं मावशी म्हणत आहे.'

गोलोक महाशयांनीं चकित मुद्रेनें तिच्याकडे पाहून विचारलें, 'कशाला बोलवीत आहे साग ना सदू!'

दासीनें उत्तर दिलें, 'थोडंसं फराळाचं घेऊन बसली आहे ना मावशी!'

गोलोक महाशयांनीं गुडगुडी खालीं ठेविली आणि हंसून म्हटलें, 'तुझ्या या मावशीचा जंजाळ आतां मला पुरेंसें करून सोडणार आहे सदू!! आज पर्वणीचा दिवस. म्हटलं एक वेळचा उपास करावा. पण तें कांहीं तिला सहन झालं नाहीं.' बोलतां बोलतां ते उठून उभे राहिले. आणि जातां जातां निःश्वास सोडून बोलून गेले, 'संसारांत राहून परलोक साधनासाठीं कांहीं करावं तर त्यांत हीं अशीं विघ्नं येतात! मधुसूदन!! हरी!!!'

* * *

## ४

संध्येला बरेच दिवसांपासून बरें वाटत नव्हतें. नेहेमी ताप येई आणि बापाचेच औषधोपचार चालू असल्यामुळें हळू हळू आजाराची वाढच होत होती. विपिन डॉक्टरला बोलायला पाठविते असा वारंवार तिची आई तिला धाक दाखवीत असल्यामुळें मायलेकरांत नेहमीं भांडणें होत. बहुतेक हे झगडे रोजच चालत असें म्हणायला हरकत नाहीं.

आज सायंकाळीं संध्या समोरच्या पडवींत बसून आईनें वाटींतून दिलेली साबुदाण्याची लापशी डोळे मिटून खाण्याचा प्रयत्न करीत होती. शेवटीं तिनें ती संपविली आणि घाईघाईनें पानाचा विडा तोंडांत कोंबून साबुदाणा उलटून येण्याची भीति घालविली. कारण या पथ्याच्या खाण्याचा तिला अगदीं मनापासून कंटाळा असे. तरी पण न खाण्यानें अथवा कमी खाण्यानें बोलून घेण्याची पाळी येईल ती टाळावी याबद्दल ती खबरदारी घेई. कुठून ना कुठून आईनें आपल्यावर नजर ठेविली आहे हें ती पक्कें जाणून होती.

यापूर्वी एक पुस्तक ती वाचीत असावी. कारण पुस्तकाचा वाचलेला भाग लक्षांत राहावा म्हणून तिनें आपल्या मांडीवर तें पुस्तक उघडें ठेविलें

होतें. विडा खाऊन झाल्यावर तिनें तें पुस्तक उचललें आणि वाचण्यासाठीं आपली नजर मजकुराकडे वळविली तोंच आंगणांतून ' काकी, आहेस का घरांत ' अशी हांक मारलेली तिनें ऐकली.

तिच्या आईला हांक मारीत निःसंकोचपणानें येणारा मनुष्य दुसरा कोणीं नसून अरुण होता. त्याच्या आंगावरील पोषाख मळलेला असून चेहराही अगदीं परिश्रांत झालेला दिसत होता. त्यामुळें नुकताच तो कुठून तरी फार दुरून आला असावा असें कोणीही अनुमान केलें असतें.

अरुणाला पाहतांच एक क्षणभरच संध्येच्या निस्तेज चेहऱ्यावर किंचित् आरक्तपणा चमकून गेला. त्याच्याकडे पाहून स्मित हास्यपूर्वक तिनें त्याला विचारलें, ' तूं कलकत्त्याहून आलास वाटतें अरुणदादा ? '

अरुण तिच्याजवळ येऊन व तिच्याकडे पाहून आश्चर्यानें म्हणाला, 'पण तूं अशी अगदीं वाळल्यासारखी कां झालीस ? पुनः ताप येऊं लागला वाटतं ? '

संध्येनें सांगितलें, ' हो. तसं कांहींसं आहे खरं. पण तुझाही चेहरा कांहीं तितकासा चांगला टवटवीत दिसत नाहीं ! '

अरुण हंसून म्हणाला, ' चेहऱ्याचा काय अपराध ? आज सगळ्या दिवसांत न्हाणें धुणें नाहीं ! बरं, तूं ज्या प्रकारची लोंकर मला सांगीतलीस तो प्रकार शोधतां शोधतां जीव कसा अगदीं हैराण होऊन गेला. हं. घे ही.'

असें म्हणून त्यानें खिशांतून कागदांत गुंडाळलेली एक पुडी काढून ती संध्येच्या हातीं देत म्हटलें, ' काकी कुठं दिसत नाहीं ! काकाही बाहेर गेले आहेत वाटतं ? गेल्या शनिवारीं मला कांहीं केल्या घरीं येतां आलं नाहीं. म्हणून ही तुझी लोंकर तुला मिळायला उशीर झाला. काय विणणार आहेस ? एकादा पक्षी कीं देवदेवता ? कीं गुलाबाच्या फुलाची—'

संध्या मध्येंच म्हणाली, ' त्याचा विचार करायला पुष्कळ वेळ आहे ! पण जी वस्तु आणायला सात दिवसांचा अवधी सहज झाला ती वस्तु द्यायला तासभऱ्याचा उशीर मानवला नाहीं ? स्टेशनावर उतरतांच घरीं न जातां अगदीं तसंच इकडे आलं पाहिजे होतं ? '

' स्नान जेवण यासाठींच म्हणतेस ना ? अग होईल संध्याकाळानंतर ! पण तूं पुनः अशी वारंवार कां आजारी पडूं लागलीस तें सांग ना संध्या ! '

' संध्या ' या शब्दावर त्याचा असलेला एक प्रछन्न निगूढ कटाक्ष संध्येच्या कानाला कसासाच लागला आणि त्या आघातानें तिचे गाल किंचित् आरक्त

झाले. पण जणुं काय आपलें त्या गूढ हेतूकडे लक्षच नाहीं अशा आविर्भावानें उसन्या रागाचें अवसान आणून ती म्हणाली, ' त्यांत आतां काय राहिलं आहे अरुणदादा ! जा. उगाचच इथं थांबून उशीर करूं नको. '

अरुण पुनः हंसून उत्तरादाखल कांहीं तरी बोलण्यासाठीं तोंड उघडीत होता तोंच जगद्धात्रीच्या चेहऱ्याकडे त्याचें लक्ष गेल्यामुळें त्याचे तोंडांतील शब्द तोंडांतच राहिले. कारण जगद्धात्री रागानें हिरवानिळा चेहरा करून घरांतूनच बाहेर आली होती. मुलीकडे पाहून ती म्हणाली, ' संध्या, अशी पान-विडा चावीत राहूं नको. तोंडांतील तो विडा आधीं थुंकून टाक आणि मग काय हंसणें बोलणें करायचें असेल तें कर.' आणि एवढेच शब्द बोलून कोणाकडेही न पाहतां घाईघाईनें पावलें उचलीत ती आंत निघून गेली.

अकस्मात् एकादा विलक्षण प्रकार घडून जावा तसें झालें. अरुण तर वज्राहताप्रमाणें निश्चल निस्तब्ध होऊन उभाच राहिला. संध्याही निस्तेज झाली. जणुं काय कांहीं क्षणपर्यंत सायंतन आकाशाची रक्तिमा आकस्मिक आलेल्या मेघामुळें लुप्तच होऊन गेली असावी ! ! संध्या कांहीं वेळ तोंड मिटून स्तब्धच राहिली; पण नंतर तोंडांतील विडा थुंकून ती रडव्या स्वरानें म्हणाली, ' अरुणदादा, तूं या घरांत असा वारंवार आणखी कशाला येतोस ? माझा सर्वस्वी नाश केल्यावांचून तुला सुख वाटणार नाहीं का ? '

अरुण तर प्रथम एक शब्दही बोलूं शकला नाहीं. नंतर धीर स्वरानें इतकेंच म्हणाला, ' तोंडांतला विडा थुंकून टाकलास संध्ये ! खरोखरच तुला मी इतका अस्पृश्य झालों ना ? '

या त्याच्या शब्दांनीं संध्येचा तोल सुटला. तिला चटकन् रडूं कोसळलें. ती त्याच स्थितींत करुणपूर्ण स्वरानें म्हणाली, ' कां तूं मला शिवलास ? तुला जात नाहीं आणि धर्मही नाहीं ? '

' काय मला जात धर्म कांहीं नाहीं ? '

' नाहीं. नाहींच. तूं विलायतेला जाऊन आलास. म्लेंच्छ झालास ! त्या दिवशीं आईनं तुला पितळेच्या तांब्यांतून पाणी प्यायला दिलं होतं ! आठवत नाहीं ? '

एक दीर्घ सुस्कारा सोडून अरुण म्हणाला, ' नाहीं. मला आठवत नाहीं; पण तुझ्याजवळ मात्र मी आज अस्पृश्य आणि म्लेंच्छ ठरलों ! '

आपले अश्रुभाराक्रांत डोळे पुसून संध्या म्हणाली, ' केवळ माझ्याजवळ

नव्हे तर सर्वांजवळ. आणि ही गोष्ट आजची नव्हे तर कोणालाही न जुमानतां तूं जेव्हां विलायतेला गेलास तेव्हांपासूनची आहे !'

तो म्हणाला, 'पण मला वाटलें होतें—'

पण 'काय वाटलें होतें' तें तो सांगूं शकला नाहीं. क्षणभर निश्चल राहून म्हणाला, 'पाहिजे तर मी पुढें या घरांत येणार नाहीं पण तूं माझा असा तिरस्कार करूं नको संध्या. मी कधींच कोणतें निंद्य असं कार्य केलेलं नाहीं.'

संध्या म्हणाली, 'तुला भूक तहान कांहीं लागली नाहीं अरुणदादा ! कीं उभ्याउभ्यानं तूं असा माझ्याशीं भांडतच राहणार ?'

अरुणनें उत्तर दिलें, 'नाहीं. मी भांडत नाहीं. माझा तिरस्कार वाटणाऱ्यांसमोर उभा राहून वादविवाद करण्याचा कमीपणा मला नको आहे.' असें म्हणून अरुण हळूहळू दाराबाहेर निघून गेला आणि तो गेला त्या बाजूकडे टक लावून पहात एकाद्या दगडी पुतळ्याप्रमाणें संध्या स्तब्ध बसून राहिली.

आई तिच्यासमोर येऊन प्रसन्नतेनें म्हणाली, 'जाऊं दे. मला वाटतं आतां पुनः यायचा नाहीं.'

संध्या चकित होऊन म्हणाली, 'नाहीं.'

आईनें सुचविलें, 'उगाच तुला त्यानं शिवाशिव केली. जा. अंगावरचं सोडून टाक.'

संध्येनें आईच्या तोंडाकडे पाहून विचारलें, 'अंगावरचं सोडलंच पाहिजे.'

मुलीच्या खिन्न मलूल अन्तःकरणाचें चित्र आईच्या नजरेला दिसलें नाहीं. तिच्याकडे आश्चर्यानें पाहून ती म्हणाली, 'सोडायला नको ? किरिस्तांव माणूस तो ! एकादी विधवा-बिधवा असती तर तिला डोकीवरूनच न्हावं लागलं असतं !! त्या दिवशीं ती रासू मावशी-होय-तिचा थोडासा अतिरेक होतो खरा-पण आचारविचार शिकावे तर तिच्यापासूनच ! दुल्याची पोरगी शिवली कीं शिवली नाहीं नकळे पण स्वतःच्या नातीला तिनें त्या टवटवीत तीन्हीसांजचे वेळींसुद्धां पाण्यांत बुडी मारायला लावलं तेव्हां घरांत घेतलं !'

संध्या म्हणाली, बरं तर आई. जातें मी—'

आई मान वेळून ब्राम्हणी आचारविचारासंबंधानें कदाचित् आणखीही थोडाबहुत उपदेश मुलीला करण्याच्या प्रयत्नांत होती पण तितक्यांत मागच्या बाजूनें 'जगो, घरांत आहेस का ?' असे परिचित शब्द तिनें ऐकले.

ती त्या शब्दानुरोधानें तिकडे मान वळवून पहाते न पहाते तोंच गोलोक चाटुर्य्ये ओसरीच्या पायऱ्या चढून वर आलेसुद्धां! जगद्धात्रीचें त्यांच्याकडे लक्ष जातांच तिनें म्हटलें अग बाई! चाटुर्य्ये मामा आले!! आज केवढं भाग्य!!'

पण याचवेळीं त्या दिवशीं घडलेल्या प्रकाराची आठवण होऊन ती घाबरलीसुद्धां. कारण रासू मावशी आणि तिची मुलगी संध्या या दोघींचा त्या दिवशीं चांगलाच खटका उडाला होता. तो प्रसंग आठवून ती भ्याली. तोंड सुकून गेलें. संध्याच उभीच होती. तिच्याकडे लक्ष जातांच गोलोक महाशयांनीं तिच्या आईच्या प्रश्नाचें उत्तर न देतां तिच्याशींच बोलणें सुरू केलें. ते हंसून म्हणाले, 'म्हटलं आमची संध्यानात कशी काय आहे! काय ग? अगदीं आजाऱ्यासारखी दिसतेस. वाळून गेलीस पोरी!

संध्या बोलली, नाहीं तसं नाहीं कांहीं. पण तुम्हीं बरें आहां ना आजोबा?'

जगद्धात्री आपल्या म्लान चेहऱ्यावर किंचित् हास्यरेषा उमटवून म्हणाली. 'आतां कितीतरी बरी आहे. महिना गेला मामा! रोज आजारी, रोज ताप असा प्रकार सुरू आहे. अजूनही साबुदाणाच खाते.'

गोलोक महाशय म्हणाले, 'असं का? कां नाहीं आजारी पडणार? अग आज ही कडीखांद्यावर मुलंबाळं खेळवीत असायची! पण तूं तर हिला अजून तशीच ठेविली आहेस! अग हिचं लग्न कधीं करणार तूं? वय तर—'

वयाबद्दलची चर्चा व्हायला नको म्हणून तो प्रसंग टाळण्याच्या हेतूनें जगद्धात्री घाईघाईनें मध्येंच म्हणाली, 'काय करायचं मामा? मी एकटी बायको माणूस! कोणकोणत्या बाजू म्हणून सांभाळूं? तुमच्या जांवयाचं तर लक्षच नाहीं इकडे. नेहमी डॉक्टरींत गढलेलं असायचं. मला अगदीं कंटाळा येतो. हें सगळं सोडावं आणि एकदम सासुबाईकडे काशीला जाऊन राहावंसं वाटतं! मागं मग ज्याच्या नशिबीं जें असेंल तें होवो? बोलतां बोलतां तिचा स्वर सद्गदीत झाला.

गोलोक म्हणाले, 'तो वेडा आहे कुठें? काय करतो?'

जगद्धात्री बोलली, खरंच. पक्कं वेड लागेल तर सुटेन एकदांची. खोलींत घालून बाहेरून कडी लावून घेतली म्हणजे झालं. माझा दुचितमार झाला आहे अगदीं! जाळून पोळून पार राख करून टाकली.' असें म्हणून तिनें पदरानें डोळ्यांचे कोंपरे पुसले.

गोलोक महाशय सहानुभूतीच्या स्वरानें म्हणाले, ' खरं तें. खरंच तें. मी बरंचसं ऐकलं आहे. तरी पण तूंही अगदीं धनुर्भंगाचा पण करून बसलेली दिसतेस. स्वतः कुमार कार्तिक नसला तर मुलीचं लग्नच करायचं नाहीं असा तुझा हेतू दिसतो. आमचं कुलीनाचं घराणं. तसला सुंदरपणा कुठला असायला ! आणि होता तरी कधीं ? ऐकलंस नाहीं ? त्या काळीं म्हणे किती तरी कुलीन कन्यकांना गंगायात्रा करून कुलरक्षण करावं लागत होतं ! मधुसूदन. तूंच एक सत्य ! '

जगद्धात्री क्षुब्धस्वरानें म्हणाली, ' कुणी सांगितलं मामा तुम्हांला हें ? माझा जांवई मोरावर बसूनच आला पाहिजे नाहीं तर माझी मुलगी देणार नाहीं असं मी कधीं म्हटलं ? आधीं मुलगी कीं आधीं कुल ? वंशांत कोणी कधीं शुद्र म्हणून कायस्थांच्या घरांत पायही धुतलेले नाहींत. आमचा असा हा रिवाज मग मुलगी पाण्यांत लोटावी लागली तरी मी लोटीन ! '

या आश्वासनानें वृद्ध गोलोक चटर्जी खूष होऊन म्हणाले, ' हं. असं पाहिजे. ठीक आहे. आतां मी पाहतों.'

जातें जातें म्हणून ही संध्या आरक्त चेहऱ्यानें खालीं मान घालून अजून तेथेंच उभी होती. गोलोक आजोबा हास्यपूर्वक तिच्याकडे पाहून रहस्यमय भाषेनें म्हणाले, ' अग, कार्तिकेयासारखा सुंदरच जांवई पाहिजे असा जर तुझा पण नसेल जगो तर माझ्याच हातीं सोंपव ना हिला ! कुलाशिलाची हरकत नाहीं आणि राहील ही राणीच्या थाटानें ! कसं काय नाती ? पसंत आहे ना मी ? '

दुसरी एकादी वेळ असती तर नात या नात्यानें संध्येनें आजोबाची चांगलीच थट्टा केली असती; पण अरुणाच्या आगमनापासून वडलांना वेडे ठरविण्यापर्यंत नुकत्याच झालेल्या सगळ्या गोष्टी ध्यानांत घेऊन आधींच रागानें, दुःखानें आणि लाजेनें तिचें अन्तःकरण पेटत होतें. त्यांत हा प्रश्न मग काय विचारतां ! तिनें मान वर करून आजोबांकडे पहात रूढ स्वरानें जबाब दिला, ' कां नाहीं पसंत होणार आजोबा ? दोरीनें विणलेल्या पाळण्यांत बसून इकडच्या बाजूनें या. गुंफलेली फुलांची माळ घेऊन त्यावेळीं मी राहीन दारांत उभी ! ' इतकेच शब्द बोलून ती दिंडी दरवाजांतून घाई-घाईनें बाहेर निघून गेली !

ती अतिशय रागावली होती हें स्पष्टच दिसत होतें. आपण केलेल्या

विनोदाला असें तीव्र वेदना देणारें उत्तर मिळेल अशी गोलोक महाशयांची कल्पना नसल्यामुळें ते प्रथम थक्कच झाले. नंतर 'होः होः' करून तोंड-देखलें नीरस हास्य करून म्हणाले, 'अरे ही मुलगी कीं विलायती सोल्जर! आजोबा नाती संबंध. काय झालं ग बोललों म्हणून? पण त्या दिवशीं रासूच्या तोंडून ऐकलें तेंच खरें. प्रत्यय आला त्याचा. फटकळ आहे. तोंडाला येईल तें बोलते. आईबापाचीही पर्वा करीत नाहीं. खरं आहे तें.'

जगद्धात्रीला प्रथमपासून हीच भीति वाटत होती. मात्र मध्यें झालेल्या कळकळीच्या आणि थट्टेच्या भाषणामुळें भीतीचा डोंगर मागें पडला असें तिनें अनुमान केलें होतें. आणि कदाचित् तो डोंगर मागेंही पडला असता; पण पोरीनें निष्कारण काठीनें ठोकर मारून बिळांतील सापाला बाहेर आणून सोडलें. आणि त्यामुळेंच मुलीचा तिला पराकाष्ठेचा राग आला. तरीपण तसें बाहेर कांहीं न दाखवितां ती विनयानेंच म्हणाली, 'नाहीं मामा. संध्या त्या वेळीं तसं कांहीं बोलली नव्हती. राईचा पर्वत करण्याची मावशीला संवय आहे हें तुम्हीं चांगलें जाणतांच!'

गोलोकनें उत्तर दिलें, 'होय मी जाणतों. पण तसं ती कधीं माझ्याकडे करीत नसते.'

'मी त्यावेळीं जवळच उभी होतें मामा!' जगद्धात्रीनें खात्री दिली.

गोलोक महाशय श्लेषपूर्ण स्वरानें हंसून म्हणाले, 'तर मग जास्त प्रशंस-नीय. तिला कांहीं शिक्षाही करतां आली नाहीं तुला!'

त्यांच्या त्या हंसण्यानें मनातल्या मनांत थोडा धीर आला आणि ती रागानें म्हणाली, 'शिक्षा? तुम्हीं पहा तरी मामा मी तिची काय दशा करून सोडतें ती!'

कांहींशा स्निग्ध स्वरानें गोलोकनीं तिला समजावलें, 'राहूं दे. तिची दशा आणि छळ करण्याचें आतां कारण नाहीं. लग्न झालं, संसाराच्या जोखडा-खालीं पडली म्हणजे आपोआप ती सुधारेल. आणि हाच विचार करून तूं शासन करण्याचें सोडून दे. आजकालची परिस्थिति फार भयानक आहे. अरुण आतां येतो?'

जगद्धात्री भीतीनें खोटेंच बोलून गेली. 'अरुण? नाहीं —'

गोलोक चटकन् बोलले, 'उत्तमच. पोराला इकडे फिरकूं देऊं नको. माझ्या कानांवर अनेक प्रकारचे लोकापवाद येत आहेत. त्या गुंडाला मी चांगलाच ओळखतों.'

अरुणाला लहानपणापासून दादा या नांवानें संध्या हांक मारीत असे. आणि तो विलायतेला जाईपर्यंत या दोन घराण्यांत चांगला सलोखा आणि घरोब्राही होता. अर्थात् संध्येच्या आणि अरुणच्या स्नेहममतेंतही अंतर पडलें नाहीं. पुढें तो विलायतेला गेला आणि ब्राह्मण वंशांत जन्मून त्यानें स्वतःची अधोगती करून घेतली. ब्राह्मण्याची उच्च पायरी उतरून तो पार खालीं गेला. अर्थात् दोघांच्या त्या बालपणच्या स्नेहाचें रूपांतर होऊन तें इतकें वर-चढ होईल, लोकापवादाचे तीर सुटूं लागतील असें संध्येच्या आईला स्वप्नांतही वाटलें नाहीं. पण कांहीं दिवसांपासून संध्येच्या आचरणानें आणि बोलण्या-चालण्यानें मधून मधून तिला अशा कांहीं यातना आणि मनस्ताप होऊं लागला कीं झांकलेल्या डोळ्यांसमोरही भावी परिणामाचें चित्र दिसत असल्याचें तिला जाणवलें. तरीपण शेवटीं आपणाला त्यासाठीं उद्विग्न व्हावें लागेल, माणसांतून उठण्याची पाळी येईल याची तिला कल्पनाही नव्हती. पण या वेळीं त्याच लोकवार्तेचा स्पष्ट प्रतिध्वनी अशा प्रकारें मामाच्या बोलण्यांतून निघूं लागल्यामुळें तिला संताप आला. आणि ती कांहींशा तीव्र स्वरानेंच म्हणाली, ‘ कोणी ऐकूंच लागलें तर बरेंचसें ऐकावें लागेल मामा! पण माझ्याच मुलीबद्दल लोकांत इतकी चर्चा तरी कां व्हावी ? तिला पाहूनच लोकांचा कपाळशूळ कां उठतो ?

गोलोक महाशय किंचित् हंसले आणि धिम्म्या स्वरानें म्हणाले, तें खरें आहे मुली ! सावधगिरी बाळगिली नाहीं तर लोकांचें आगलावें तोंड बंद करतां येत नाहीं जगो ! ’

जगद्धात्री याचेंही उत्तर देण्यासाठीं तोंड उघडीत होती, पण अगदीं याच वेळी संध्येचा विलक्षण प्रकार पाहून ती भीतीनें, विस्मयानें आणि दारुण क्रोधानें तटस्थ झाली. आवासून मुलीकडे पहातच राहिली. संध्या पुष्करणींत स्नान करून घरांत येत होती. आंगावरचें वस्त्र ओलें, भिजलेले केस पाठीवर सुटलेले आणि त्यांतून पाणी गळत असलेलें, आंग आणि केस पुसण्याला जणुं काय अजून तिला अवकाशही मिळालेला नाहीं आणि अशा अवस्थेंत ती तिच्या जवळून घाईघाईनें पाय उचलीत आपल्या खोलींत गेल्याचें तिनें पाहिलें.

गोलोक म्हणाले, ‘ मुलीला ताप येत आहे असें आतांच म्हणालीस ना जगो! मग अशा या कातर वेळीं ती थंड पाण्याचें स्नान करून कां आली ? ’

जगद्धात्री केवळ इतकेंच म्हणाली, 'कुणाला ठाऊक मामा!' पण मनांतल्या मनांत ती जाणल्यावांचून राहिली नाहीं कीं अरुणाबद्दल आपल्याविरुद्ध पोरीनें न बोलतेपणानें उगविलेला हा कठोर सूड आहे!'

तिच्याकडे पाहून गोलोक म्हणाले, 'अशा अतिरेकानें दुखणें भलत्याच थरावर जायचें!' बहुधा भट्टाचार्यांना संध्येची ती आलेली मनुलता फारच सुरम्य वाटली असावी.

जगद्धात्रीनें उत्तर दिलें. 'तसं झालं तर मी तरी काय करूं मामा? ती माझ्या आंवाक्या बाहेर गेली आहे!'

गोलोक महाशय मस्तक डोलवीत म्हणाले, 'तें समजलोंच. बरं, या घरांतील कर्तापुरुष—घरमालक आहे कुठें. आणि मी असें विचारतों, मालक तरी कोण? तूं, जांवई कीं तुझी मुलगी?'

जगद्धात्रीनें जबाब दिला, 'माझ्याशिवाय सगळेच मालक!

'तर मग त्याला असें सांग, या भागांत दुले बाग्दी लोक राहूं द्यायचे नाहींत. आणि त्यानें ती व्यवस्था केली नाहीं तर शेवटीं मला त्यांत हस्तक्षेप करावा लागेल. मधुसूदन! तूंच एक भरंवसा.'

उत्तर देण्याच्या ऐवजी जगद्धात्रीनें रागाच्या भरांत मुलीलाच हांक मारली, संध्या, ये इकडे.'

आपल्या खोलींत संध्या केस पुशीत असावी कदाचित्. तिनें दारांतून किंचित् डोकावून विचारलें, 'काय आई?'

आई बोलली, 'त्या दुले कारटीला इथून घालविणार आहेस कीं मलाच उद्यां झाडू मारून हांकलून द्यावी लागणार?'

संध्या आंतूनच म्हणाली, 'आई मुलगी दोघीही अनाथ दुःखी! त्यांना झाडू मारून हांकून लावणं कांहीं मोठंसं कठीण नाहीं. पण त्या बिचाऱ्यांनीं असं कुणाचं नुकसान तरी काय केलं आहे?'

याचें उत्तर गोलोक महाशयांनीं दिलें. ते म्हणाले, 'नुकसान करतात नाहीं तर काय. परवां या पांदणींतून जातांना पाहिलं, रस्त्यांत उभी राहून त्या बोकडाला ती पेज घालीत होती. अग खरकटं चोंहोंकडे पडतं ना?' असा प्रश्न करून यांनीं जगद्धात्रीकडे पाहिलें.

जगद्धात्रीही तत्क्षणांत त्या गोष्टीचें समर्थन करण्याच्या हेतूनें म्हणाली, 'पडेल तर काय होईल मामा!'

गोलोक म्हणाले, ‘ म्हणून म्हणतों. अग न जाणतां सापाचं वीषही मनुष्य खातो पण जाणून तर खाववणार नाहीं ? ’ नंतर संध्येकडे पाहून त्यांनीं हंसून म्हटलें, ‘ नाती, तूं अजून लहान आहेस. तूं अशा टवटवीत तिन्हीं सांजाही न्हाऊं शकतेस म्हणून मला तर तसं करतां येत नाहीं ना ? ’

आंतल्या आंत धुमसणारा राग तसाच दाबून संध्या म्हणाली, ‘ तें मलाही माहीत आहे आजोबा. पण बाबांनीं जर त्यांना इथं राहा म्हणून सांगितलं आहे तर दुसरीकडे कुठं तरी जागा करून दिल्यावांचून कांहीं इथून जा असं त्यांना सांगतां येणार नाहीं. तसं केल्यानं त्यांचा अपमान नाहीं कां होत ! ’

मान-अपमानाबद्दल मुलीचा झालेला हा भलताच समज पाहून आई रागावली आणि त्या रागाच्या अतिरेकामुळें तिच्या तोंडून शब्दही उमटेना; पण तें काम गोलोक महाशयांनीं केलें. ते म्हणाले, ‘ ठीक. त्याला ग काय तोटा आहे संध्या ? अरुणाच्या घरामागें तर हवी तेवढी जागा आहे ! तेव्हां त्यालाच कां सांगेनास त्या दोघांना आधार द्यायला ! बाग्दी-दूले झाले तरी हिंदूच आहेत. तेवढ्यानं कांहीं त्याची जात नष्ट होत नाहीं ! ’ असें म्हणून ते जगद्धात्रीच्या तोंडाकडे पाहून हळूहळू हंसूं लागले. त्यांनीं केलेल्या या विनोदाचें रसग्रहण करण्याचें ज्ञान जगद्धात्रीला कितीही असो; पण अरुणाचा केलेला हा अप्रत्यक्ष उपहास ऐकून आपल्या चिडखोर आणि मागचापुढचा विचार न करतां बोलणारी मुलगी कांहींतरी भलतेंच भयंकर बोलून जायची या जाणिवेनें तिच्या भीतीला मर्यादा उरली नाहीं.

आणि झालेंही बरोबर तसेंच. संध्येच्या बोलण्यांत परिहासाचा समुद्र उचंबळून येत होता; पण ती जे बोलली तें मात्र जितकें मर्मभेदक तितकेंच कठोर होतें. तिनें म्हटलें, ‘ आणि जात गेली तरी त्याची फिर्याद कुणाला आहे सांगा पाहूं ? जातच जी मानीत नाहीं त्याला ती गेली काय आणि राहिली काय सारखंच ! ’

गोलोकनीं हंसण्याचा प्रयत्न केला; पण त्यांचा चेहरा मात्र काळा ठिक्कर पडला. तरी पण ते बोललेच, ‘ तुझ्याबरोबर त्याचा या संबंधानेच विचार-विनिमय चालतो वाटतें ? ’

संध्या खळाळून हंसली आणि म्हणाली, ‘ आजोबा, काय सांगूं कपाळ ! अहो ते तुमच्यासारख्याला जेथें जुमानीत नाहींत तेथें माझी काय कथा ! ’

यानंतर हा वादविवाद असाच पुढें चालविण्याची अपेक्षा न धरत

डोळ्यांची पापणी मिटते न मिटते इतक्या अल्पावधींत ती आपल्या खोलींत निघून गेलीसुद्धां !

पण जगद्धात्रीला तें सहन झालें नाहीं. ती तिला धमकावून म्हणाली, ‘ दळभद्रे पोरी, परकी मुलाला नसता दोष तूं कशाला लावतेस ? तो काय कुणाला माहीत नाहीं ? शिवाय तो असें कधींही म्हणाला नाहीं हें मी गंगेच्या पाण्यांत उभी राहून सांगेन. ’

या प्रश्नावर खोलींतून कोणतेंच उत्तर आलें नाहीं. तेव्हां गोलोक आपण होऊनच म्हणाले, ‘ नाहीं जगो ! रागवायचें नाहीं. आजकालचीं मुलें-मुलगे मुली कोणी असोत-सगळींच अशीं आहेत खरीं ! बरें मी आपला कुत्र्या मांजराच्या योग्यतेचा आहें. असूं दे. पण जगो, एक गोष्ट तुला आज सांगून जातों, यापुढें मुलीचें लग्न करायला मात्र विलंब करूं नको. कुठेंही जुळूं दे एकदा करून टाक आणि पाप दूर कर. पापाला घालवून दे. ’

जगद्धात्रीला रडूं कोसळलें. ती रडत रडतच म्हणाली, ‘ मामा, द्या ना एकादं स्थळ पाहून. आता मला विचार करायला मुद्धां सामर्थ्य नाहीं.’

गोलोक महाशय मान डोलवीत डोलवीत म्हणाले, ‘ ठीक आहे, पाहतों. पण लक्षांत ठेव. ही तुझी एकुलती एक मुलगी. तेव्हां दूर कुठें तरी स्थळ पाहून लग्न केलं तर तुझ्यानं कांहीं केल्या राहवणार नाहीं; पोरीच्या वियोगानं रडून कढून मरून जाशील.’ तसेंच आमच्या या कुलीन घराण्यांत वराच्या वयाकडेही पाहून चालत नाहीं. तेव्हां ही कुठेंतरी जवळपास राहील, सकाळ सायंकाळ पाहतां येईल अशा जागीं दे. म्हणजे मग तुझ्या सुखाला पारावार राहणार नाहीं.’

जगद्धात्री डोळे पुसून करुण स्वरानें म्हणाली, ‘ असं सोयीचं स्थळ कुठं मिळणार मला मामा ! आतां घरजांवई—’

तिला आपलें वाक्य पुरें करूं न देतां गोलोक मध्येंच म्हणाले, ‘ छे. छे. असली गोष्ट तूं तोंडाबाहेर काढूंही नको जगो ! घरजांवयाचा काळ आतां उरलेला नाहीं. तसें करणें अगदींच निंद्य ! ! आणि जर एकदां गांवगुंड घरांत आणलास तर गांजा तंबाकू ओढून दांडगाई आणि वेडेचार करण्यांतच तुझें जें कांहीं आहे तें घालवून बसेल ! म्हणतों, तूं आधीं स्वतःच्या स्थितीचाच विचार करून पाहा ना ! ’

या शेवटच्या वाक्यांतील मर्म जाणून जगद्धात्री ताबडतोब उसळून म्हणाली,

'तें नेहमींच पहातें आहें मामा. जमण्याबिमण्यांतच माझा सगळा जन्म चालला आहे ना !'

गोलोक किंचित् हंसून म्हणाले, 'म्हणूनच म्हणतों. अग कांहीं कामकाज न करतां आयतोबासारखं बसल्या जागीं खायला मिळालं म्हणजे हें असं व्हायचंच. आणि हें काम मी तुझ्यासारख्या बुद्धिमान मुलीला मी सांगितलं पाहिजे ? तुला नाहीं समजत ?'

जगद्धात्री समाधानाच्या स्वरानें म्हणाली, 'समजतें तर काय झालें ? मनांतल्या मनांत मी सगळं जाणतें. पण मी पडलें बायको माणूस ! कुठंही पाहिलं तरी आधार कांहीं दिसत नाहीं.'

आश्वासन देण्याच्या आविर्भावानें गोलोक म्हणाले, 'दिसेल-दिसेल. उतावीळ होऊन कसं चालेल ! थोडा विचार करून पाहतों. बरं पण आतां निघतोंच मी. अगदीं सांज होत आली.'

जगद्धात्री विनवणीच्या स्वरानें म्हणाली, 'मामा, अगदीं उभ्या-उभ्यानंच बोलत राहिलां. थोडे बसा ना !'

गोलोकनीं जबाब दिला, 'नाहीं. नाहीं. संध्या आन्हिकाची वेळ निघून जात आहे. आज आतां थांबत नाहीं. विलंब होईल.' असें म्हणून हळू हळू पावलें टाकीत ते बाहेर पडलेसुद्धां. जगद्धात्री त्यांना पोंचवीत पोंचवीत सदर दरवाजाच्या बाहेर गेली.

* * *

## ५

सकाळच्या वेळीं प्रिय मुखर्ज्ये महाशय अतिशय गडबडीनें प्रॅक्टिसला चालले होते. बगलेंत होमिओपॅथी पुस्तकांचा गठ्ठा दाबून धरलेला, टॉवेलांत बांधलेली औषधांची पेटी हातांत, अशा स्थितींत एककडी दुल्याची विधवा बायको विनवणींच्या स्वरानें बोलत मागून चाललेली असा तो एकंदर थाट होता. 'बाबा ठाकूर, तुम्हीं दया केली नाहीं तर आम्हीं जावें कुठें ?' हें तिचें बोलणें.

प्रियबाबूंना मागें तोंड वळवून तिला उत्तर देण्याला वेळच नव्हता. त्यांनीं डावा हात मागें करून तो नकारदर्शक हालवून म्हटलें, 'नाहीं

नाहीं. नाहीं. तुला मी ठेवूं शकत नाहीं. तुम्हीं अगदीं निलाजरीं माणसें आहां. तूं त्या बोकडाला तांदळांची पेज कशाला पाजलीस ?'

दुल्याची बायको विस्मयानें म्हणाली, 'सर्वांच्याच मेंढ्यामेंढी तर पेज खातात बाबा!'

अतिशय रागावून प्रियबाबू म्हणाले, 'पुन: खोटें बोलतेस ? हरामजादी ! कुणाचेही बोकड पेज खात नाहीं. बोकड गवत खातात!'

दुल्याच्या बायकोनें उत्तर दिलें, 'गवत खातात, पानपाचोळा खातात आणि पेजही खातात ठाकुरबाबा!'

प्रियबाबूनें तसाच हात हालवून म्हटलें, 'नाहीं. नाहीं. तुला मी आतां राहूं देणार नाहीं. तुम्हीं आजच निघून जा. तूं ब्राह्मणवाडींत राहून बोकडाला पेज खाऊं घालतेस असें गोलोक चाटुर्ये कालच सांगून गेले! आतां मी तुमच्यावर मुळींच दया माया करणार नाहीं. तुम्हीं निलाजरीं आणि अडाणी आहां.'

दुल्याच्या बायकोनें विनवणीच्या स्वरानें विचारलें, 'तर मग काय सगळी पेज टाकून देऊं ठाकूरबाबा!'

प्रियबाबूनीं बेफिकीरपणानें उत्तर दिलें, 'हां. दे. तुझ्या गाई म्हशी असत्या आणि त्यांना तूं पेज पाजली असतीस तर त्यांत दोष नव्हता! पण बोकडाला पेज पाजणें म्हणजे केवढी भयंकर गोष्ट! आजच चालती हो. समजलें ? छे. फारच उशीर झाला. सत्कार देण्याचा टाईम निघून गेला अगदीं!'

असें म्हणून त्यांनीं आपला चालण्याचा वेग वाढविला. तोंच दुल्याची बायको दीन वाणीनें मागून म्हणाली, 'ठाकूरबाबा, कालच्या चार प्रहरांत पोरीच्या पोटांत भाताचें शीत गेलेलें नाहीं—'

हे शब्द ऐकतांच प्रियबाबू ताबडतोब उभे राहून मागें वळून म्हणाले, कां ? कां ग ? पोटांत दुखत आहे ? कीं ओकून आल्यासारखें वाटतें ?'

दुलाच्या बायकोनें मानेनेंच 'नाहीं' म्हटलें.

'तर काय ? पोट फुगलें आहे ? भूक नाहीं ?'

'पोर फारच भुकेली आहे बाबा ठाकूर!'

प्रियबाबू म्हणाले, 'हं. असं सांग. तोसुद्धां एक दांडगा रोगच आहे! नॅट्रम आयोडीयम् आणखींही पुष्कळ औषधें आहेत त्याच्यावर. अजूनपर्यंत

कां नाहीं बोललीस? पाहून सवरून एक डोस पाजूनसुद्धां आलों असतों. चल पाहूं—'

दुल्याची बायको इकडे तिकडे पाहून म्हणाली, 'औषध नको टाकूरबाबा! मूठभर तांदुळ मिळाले असते तर पोरीला ते शिजवून घातले—'

तिच्याकडे क्षणभर विस्मयाने रोंखून पहात राहून प्रियबाबू एकदम चवताळल्यासारखे होऊन म्हणाले, 'औषध नको, तांदुळ पाहिजेत? हरामजादी! चालती हो माझ्या समोरून. आग लागो या हलक्या जातीच्या तोंडाला!'

दुल्याची बायको बिचारी शरमिंदी होऊन मागें फिरूं लागली तोंच प्रियबाबू तिला धमकावून म्हणाले, 'खायला कांहीं मिळालें नाहीं तर संध्ये-कडे जाऊन सांग ना.'

ती बिचारी मुकाट्यानें त्याच्याकडे पहातच राहिली.

प्रियबाबू पुनः म्हणाले, 'हं. तिच्याकडे—घरमालकिणीकडे—जाऊं नको मरायला! घाटाच्या डाव्या बाजूला उभी राहा आणि आकाताई—संध्या—आली म्हणजे तिला, माझ्या मोठ्या पेटींत अधेली आहे ती द्यायला सांग. पण ध्यानांत ठेव, आजार बिजार झाला तर मलाच बोलवायला पाहिजे. नाहींतर जाशील त्या दिवसासारखी विपिनकडे—कोण रे त्रैलोक्य नव्हे का? षष्ठीचरणही आहे वाटतं! कसं काय, घरची सर्व मंडळी खुशाल ना?'

हलक्या पावलानीं दुल्याची बायको निघून गेल्यावर त्रैलोक्य आणि षष्ठी-चरण पुढें आले. नंतर ते नमस्कार करून म्हणाले, 'जी हां. आपल्या आशिर्वादानें सर्व कांहीं ठीक आहे. सगळी मंडळी खुशाल आहे.'

तेव्हां प्रियबाबू अस्पष्ट स्वरानें आशिर्वाद देऊन म्हणाले, 'ठीक. ठीक. सध्यांचे हे असे कांहीं दिवस आले आहेत, मला स्नानाला आणि जेवण-खाणाला वेळच मिळत नाहीं. घरोघर सर्दी–खोकला आहेच. थोडासा हलगर्जीपणा केला कीं ब्रांकायटीस होणारच. बरं, सकाळींच कुठं निघालांत?'

त्रैलोक्यानें उत्तर दिलें, 'जी. आपल्याकडेच!'

प्रियबाबूनें उत्साहानें विचारलें, 'कां? कां? माझ्याकडे कशाला बरें?'

त्रैलोक्यानें उत्तर दिलें, 'लोकांना जाण्यायेण्याला फारच कष्ट होतात जांवयीबाबू, तेव्हां मध्यें पडलेल्या नाल्यावर एक सांकव घालावा म्हणतों. तयारी केली आहे सगळी; पण आपल्याकडे असलेलें तें वैकुंठाचें वेळूचें झाड दिल्यावांचून,त्या कामाची पूर्तता होणार नाहीं.'

प्रियबाबू रागानें म्हणाले, ‘ पण मीच कशाला दिलें पाहिजे ? आणि कां देईन ? गांवांत काय आणखीं माणसें नाहींत ? ’

म्हातारा षष्ठीचरण इतका वेळ स्तब्धच राहिला होता. आतां तो खालीं मान घालून पुढें सरला आणि नमस्कार करून म्हणाला, ‘ जर अभय देत असाल तर बोलतों जांवयीबाबू ! खरें सांगायचें म्हणजे या गांवांत आपल्या-वांचून माणूसच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. आपण दया केली तर दहा लोकांची जाण्यायेण्याची सोय होईल. नाहीं तर आम्हीं हे असे गरीब शेतकरी. वेळू विकत घ्यायला रुपये आणावे कुठून ? ’

प्रियबाबू कांहीं वेळ स्तब्ध राहिले आणि नंतर त्यांनीं विचारलें, ‘ लोकांना फारच त्रास होतो नाहीं का ? ’

त्रैलोक्यानें उत्तर दिलें, ‘ ठाकूरबाबा, लोक मरत आहेत अगदीं ! हातपाय मोडणें म्हणजे मरणच नव्हे तर काय ? ’

‘ पण आमच्या तिनें ऐकलें तर अगदीं रागवेल त्याचें काय ? ’ प्रियबाबूंनीं आपल्या तोंडाळ बायकोच्या रागाबद्दल शंका घेतली.

षष्ठीचरण म्हणाला, ‘ आपण दिल्यावर मग आईसाहेब काय करणार ? आणि कांहीं म्हणाल्याच तर आम्हीं सगळेच जाऊन त्यांचे पाय धरूं ! ’

प्रियबाबू काळजीयुक्त चेहऱ्यानें तसेंच कांहीं वेळ उभे राहून नंतर म्हणाले, ‘ लोकांना त्रास होतोय म्हणतां, मग जा घेऊन. पण तिला कळूं देऊं नका. छे. फारच उशीर झाला ! रसकेवाग्दीचें कुटुंब रात्रीं कसें काय होतें कुणास ठाऊक ! ब्रायोनियाचा ॲक्शन. हालचाल केली कीं वेदना होणारच. बरं जातों. निघालों हं—’ बोलतां बोलतां प्रियबाबू निघून गेले.

षष्ठीचरण किंचित् हंसला; पण त्रैलोक्य म्हणाला, ‘ वेडपट आहे असें लोक म्हणतात खरें पण म्हातारबुवा, या वेड्या ब्राह्मणावांचून दीन दुबळ्यांची कळकळ कुणालाच नाहीं बघ. मन कसें गंगेच्या पाण्याप्रमाणें शुद्ध ! ’ असें ज्या बाजूनें प्रियबाबू गेले होते त्या बाजूकडे तोंड करून त्यानें दोन्हीं हात जोडले.

षष्ठीचरण म्हणाला, ‘ हुकूम झाला आहे आतां उशीर लावून उपयोगीं नाहीं त्रैलोक्य ! काम झालें म्हणजे मिळविली ! ’

त्रैलोक्य मान डोलवून म्हणाला, ‘ तर मग चला म्हातारबुवा.’

* * *

## ६

संध्याकाळचा अंधार हळूहळू गाढ तर होत चालला होता. पण अजूनही दिवा लावण्यांत आला नव्हता.

अरुण आपल्या लेखनवाचनाच्या खोलींत टेबलावर दोन पाय सोडून कडीपाटाकडे पाहत स्तब्ध बसला होता. उघडलेलें पुस्तक मांडीवर तसेंच पडलेलें होतें आणि कोणी एकाद्यानें लक्षपूर्वक पाहिलें असतें तर, सायंकाळच्या वाढत्या अंधारामुळेंच तें वाचायचें राहिलें आहे असें नसून सायंकाळापूर्वीपासूनच चांगला उजेड असतांही तें तसेंच पडून आहे असें सहज जाणतां आलें असतें.

वास्तविक तो कांहीं कामालासुद्धां बाहेर जात नव्हता. इतकेंच नव्हे तर घराबाहेर पडण्याचेंही त्यानें बंद केलें होतें. आणि 'एका माणसाजवळ मी कायमचा अस्पृश्य झालों' हा एकच विचार वारंवार आज इतके दिवस त्याच्या मनांत चालला होता. विचारातिरेकानें त्याचे शारीरिक व्यापारही बंद झाले होते असें म्हणायला हरकत नाहीं. तुच्छता आणि अस्पृश्यता यांची मजल येथपर्यंत जाऊन पोंचली आहे कीं, माझा स्पर्श होतांच तोंडांतील पानही थुंकून टाकावें लागतें! या विचारानें त्याच्या भावना भारावून गेल्या होत्या! मन बधिर होत चाललें होतें.

पण त्याच्या या विचारतंद्रींत अकस्मात् अडथळा उत्पन्न झाला. दाराजवळ झालेल्या आवाजानें त्यानें कडीपाटाकडे रोखलेली आपली नजर तिकडे वळविली आणि तेथें ती स्थिर करून टक लावून पहात विचारलें, 'कोण आहे?'

'मी संध्या!' असें उत्तर देऊन खुद्द संध्येनेंच दरवाजा उघडला आणि दाराच्या चौकटीला धरून ती उभी राहिली.

उत्तर आणि उत्तरामागोमाग दर्शन होतांच अरुणानें गडबडीनें टेबलावर सोडलेले पाय खालीं केले, तो उभा राहिला आणि अत्यंत विस्मयाच्या स्वरानें त्यानें विचारलें, 'तूं इथें? अशा वेळीं? ये आंत येऊन बैस.'

संध्येनें उत्तर दिलें, 'मला बसायला वेळ नाहीं. मी पुष्करणीवर आंग धुवायला म्हणून निघालें तीच इकडे लपतछपत आलें आहे. मी कांहीं सांगितलें तर तें तूं मानशील अरुणदादा?'

अधिकच विस्मित होऊन अरुण म्हणाला, ‘ तुझं म्हणणं मान्य करायचं ! हो खात्रीनं करीन. तूं सांगशील तें ऐकेन. ’

‘ तें मला माहीत होतेंच.’ असें म्हणून संध्या कांहीं वेळ स्तब्ध राहिली आणि नंतर म्हणाली, ‘ हे कित्येक दिवस तूं घरांतून बाहेरही पडत नाहींस असें मी बाबांकडून ऐकलें. मला त्याचं कारण कळेल का ? ’

‘ मला बरं वाटत नाहीं. ’

‘ तें साहजिक आहे. त्यांत आश्चर्य नाहीं; पण हें कांहीं खरं कारण नव्हे’ तसं असतं तर बाबानीं प्रथम मला तूं आजारी आहेस असं सांगितलं असतं.. संध्या म्हणाली.

अरुण काय बोलतो ! तो स्तब्धच राहिला. संध्या स्वतःही कांहीं वेळ तशीच राहिली आणि नंतर म्हणाली, ‘ याचं कारण मी जाणलं आहे अरुणदादा; पण आमच्या घरीं तूं यापुढं कधींही यायचं नाहीं बरं का ? ’

अरुणनं हळूहळू संमतीदर्शक मान डोलवून म्हटलें, ‘ नाहीं येणार. आणि केवळ तुमच्याच घरीं नव्हे तर या गांवात कुठेंही कुणाच्याच घरीं जाणार नाहीं. फार काय या गांवांतून बिऱ्हाड हालवून ज्या गांवांत विनापराधी मनुष्या मनुष्यांत इतका क्षुद्रपणा आणि छळ करण्याची बुद्धि नसेल त्या गांवांत जावें हाच विचार मी रात्रंदिवस चालविला आहे. ’

संध्या वर मान करून त्याच्याकडे पहात म्हणाली, ‘ जन्मभूमीचा त्याग करून निघून जाणार ? ’

अरुणानें उत्तर दिलें, ‘ जन्मभूमीच माझा त्याग करीत आहे संध्या ! माझी शिवाशिव झाली म्हणून तुला तोंडांतील पान थुंकून टाकावें लागलें इतका मी आज तुझ्याकडे अस्पृश्य झालों आहें. इतका निंद्य ठरूनही मी या गांवांत राहावं म्हणतेस तूं ? ’

संध्या निरुत्तर झाली आणि खालीं मान घालून उभी राहिली. अरुण पुढें म्हणाला, ‘ आचाराच्या नांवाखालीं दडपून गेल्यामुळें हे सनातन संस्कार तुला बधिर करीत असतील. तुझ्या मनाला याबद्दल कांहीं वाटत नसेल. पण ज्याला वाटतें, ज्याच्या भावना दुखवल्या जातात त्याला, मनुष्याकडून होणारा हा छळ आणि उपहास, मनुष्यत्वाला न शोभणारा कलंक मनाला तीक्ष्ण शस्त्राप्रमाणें जखम करतो. आणि या असल्या जखमेच्या वेदना सहन करण्याची पाळी माझ्यावर येईल याचा मला स्वप्नांतही अंदाज झाला नव्हता संध्या ! ’

क्षणभर स्तब्ध राहून संध्येनें विचारलें, ‘ पण हा कलंक तूं स्वतःच आपण होऊन लावून घेतलास नाहीं का अरुणदादा ? ’

अरुण म्हणाला, ‘ कोण जाणें ! बरं पण संध्या, प्रायश्चित्त घेतल्यावर यांतून कांहीं मार्ग निघेल असें तुला वाटतें ? ’

‘ निघेल कदाचित्.’ संध्या सांगूं लागली, ‘ पण आत्ममर्यादेला धक्का लागतो, स्वत्व नाहींसें होतें म्हणून एके दिवशीं तूं या गोष्टीला राजी झाला नाहींस, आणि आज जर तूंच आत्माभिमानावर पाणी सोडून प्रायश्चित्ताच्या भानगडींत पडूं लागलास तर मी स्पष्टच सांगतें अरुणदादा, आणखी कांहीं कर तूं कांहीं आतां इथं राहूं नको. ’

अरुण म्हणाला, ‘ पण तूं केलेला तिरस्कार मला तिथंही राहूं देणार नाहीं !

‘ पण त्यानें तुझें नफानुकसान कितीसें होणार ? ’

संध्या ? ही गोष्टही मला तूंच आपल्या तोंडानें विचारतेस ? ’ ‘ माझा संकोच आणि माझी लाज याचा बुरखा तूंच काढून टाकलास अरुण ! तेवढंही आवरण तुला ठेवतां आलं नाहीं. संकेतानं आणि उदाहरणानं तुला मी कितीदांतरी जाणविण्याचा प्रयत्न केला कीं, तूं म्हणतोस तें कधींही होणें शक्य नाहीं. तरी पण तुझी जबरदस्तीची याचना कांहीं केल्या थांबेना. बाबा कबूल करतील, आईही ती गोष्ट विसरून जाईल पण मी केवढ्या उच्च ब्राह्मण घराण्यांतील कुलकन्या आहे हें मला विसरतां येणं शक्य नाहीं. ’

अरुण विस्मयातिरेकानें हतबुद्ध होऊन म्हणाला, ‘ आणि मी ? ’

संध्येनें तावडतोब उत्तर दिलें, ‘ तूंही माझ्याच जातीचा. पण वाघ आणि मांजर एकच आहेत असं म्हणतां येणार नाहीं अरुणदादा ! ’ परंतु स्वतःच्या तोंडून हे शब्द बाहेर पडतात न पडतात तोंच आंतल्या आंत तिचें अन्तःकरण शहारलें असावें.

या तिच्या उत्तरावर अरुण कांहींच बोलला नाहीं. केवळ तिच्या चेहऱ्यावर खिळलेली आपली विस्मित आणि व्यथित नजर त्यानें दुसरीकडे वळविली.

जोरानें हंसण्याचा थोडासा प्रयत्न करून संध्या म्हणाली, ‘ तूं कुठंही जा अरुण मला कांहीं सहज विसरूं शकणार नाहींस ! वारंवार तुझा इतका अपमान कुणीही केलेला नाहीं हें पुष्कळ वर्षेपर्यंत तुझ्या ध्यानांत राहील.’

तिच्याकडे पाहून अरुणनें विचारलें, ‘ तूं कशासाठीं आली होतीस हें तर अजून सांगितलेंच नाहींस ! ’

उत्तर देण्याऐवजीं संध्या फक्त हंसली. आणि क्षणभर तोंड मिटून राहून नंतर म्हणाली, ' जगांत आश्चर्यकारक गोष्टींना आतां अंतच राहिलेला नाहीं. नंतर आणखीं कांहीं तिचें बोलायचें होतें; पण तें बोलतांच कांहीं वेळ थांबून ती म्हणाली, ' खरंच. तूं मला विसरलास, माझी आठवण तुला राहिली नाहीं तर ती कुणालाही राहणार नाहीं. कोणाच्याही आठवणीचा विषय मी होणार नाहीं, याबद्दल तुझी खात्री आहे अरुण ? माझ्या या विधानावर विश्वास बसतो तुझा ? '

अरुण निरुत्तर होऊन तिच्याकडे पहातच राहिला.

संध्या म्हणाली, ' एककडी दुल्याच्या विधवा स्त्रीला आणि मुलीला एककडीच्या बापानें घरांतून घालवून दिलें पण माझ्या बाबांनीं त्या दोघींनाही बोलवून आणलें. आम्हीं त्यांना राहयला जागा दिली. निराश्रितांना आश्रय दिला.'

' कुठें ? '

' आमच्या जुन्या गोठ्यांत. पण ब्राह्मणवाडींत त्यांना राहतां येत नाहीं. भटवाडींत त्यांनीं राहतां कामा नये.'

आश्चर्यचकित होऊन अरुणनें विचारलें, ' कां ? '

संध्येनें उत्तर दिलें, ' कां काय ? ते जातीनें दूले आहेत ना ? आमच्या पुष्करणींतून ती पिण्याचं पाणी नेते, आपल्या पाळलेल्या बोकडाला ती रस्त्यांत पेज घालते, कदाचित् त्या पेजेवर गोलोक चाटुय्याचा पाय पडेल अशा हजार भानगडी आहेत. आईनं तर प्रतिज्ञाच केली कीं, उद्यां त्यांना झाडू मारून घालवून देईन तेव्हाच स्नान करीन ! तेव्हां म्हणते अरुण, तूं त्यांना राहयला जागा दे. त्यांच्याजवळ कांहीं नाहीं. तीं दोघेंही अगदीं निराश्रित आहेत ! '

अरुण म्हणाला, ' ठीक आहे. पण मी कुठें जागा देऊं त्यांना ? '

' तें नाहीं मला माहीत. जिथं असेल तिथं दे. ही गोष्ट तुझ्याशिवाय मी आणखीं कुणाला सांगूं ? '

थोडा वेळ विचार करून अरुण म्हणाला, ' माझा माळी घर सोडून गेला आहे. त्याच्या घरांत तीं राहूं शकतील ? वाटलं तर त्यांत थोडी दुरुस्तीही करून देईन.'

वर मान करून संध्येला एक शब्दही बोलतां येईना. अधोमुखानेंच मान हलवून आपली संमति असल्याचें तिनें जाणविलें.

अरुणानें सांगितलें, ‘तर मग तूं जाऊन त्यांना पाठवून दे. माळी परत आल्यावर त्याची मी निराळी व्यवस्था करीन.’

संध्येला याचाही कांहीं जबाब देतां आला नाहीं. ती तशीच अधोमुख राहून स्वतःच्या अनावर भावनांना आवरीत असावी. नंतर बऱ्याच वेळानें ती हळूहळू म्हणाली, ‘या वेळीं माझ्या तोंडांत पानाचा विडा नाहीं आणि मी अंग धुवायलाही आलें आहें. तेव्हां या वेळीं तुला नमस्कार करून तुझी पायधूळ घेऊन जातें.’ असें म्हणून तिनें एकदम त्याच्या पायावर डोकी ठेविली आणि त्याची पायधूळ मस्तकाला लावून घेऊन ती धांवत्या पावलांनीं तेथून अदृश्य झाली.

अरुणनें तिला परत बोलविण्याचा अगर कांहीं विचारण्याचा प्रयत्नही केला नाहीं. केवळ ती गेली त्या बाजूकडे पहात स्तब्ध बसून राहिला.

*　　*　　*

## ७

बहुधा एकदोन दिवसांनंतरची गोष्ट असावी. जगद्धात्री आपल्या पुष्करणीवर स्नान करून घरांत येत होती तितक्यांत वाटेंत तिला रासमणी भेटली.

रासमणीचा चेहरा यावेळीं आग्रहातिशयानें व उत्तेजित मनोवृत्तींनीं अगदीं ओथंबून आल्यामुळें त्यावर आसन्न रुदनाची विलक्षण कळा आलेली होती. जवळ येतांच भरलेल्या डोळ्यांनीं पहात सद्गदीत स्वरानें ती जगद्धात्रीला म्हणाली, जगो, माझ्या बाळे, तुझ्या त्या वेडसर मुलीनं कुठची बाई एवढी तपश्चर्या केली होती ! शेवटीं तें पुण्य तिच्या कामाला आलें. खरंच, असं होईल असं मला स्वप्नांतही वाटलं नव्हतं !’

जगद्धात्रीला कांहींच कळलें नाहीं. तरी पण तिच्या तोंडून आपल्या मुलीचें नांव ऐकून तिला मनांत भीति मात्र वाटली. तिनें वर मान करून उत्कंठेनें विचारलें, ‘काय झालं मावशी ? संध्येनं काय केलं ?’

रासमणी सांगूं लागली, ‘जें तिनं केलं तें जगांत कोणत्या तरी मुलींनं कधीं केलं आहे कां सांग पाहूं ? जा अशीच जा. आणि ओल्या वस्त्रानं ओल्या केसानं अशीच जाऊन श्रीधराला साष्टांग नमस्कार घाल ! पंचानन आणि

विशालाक्षी यांच्या नांवानं पूजा पाठवून दे. पण मला मात्र बाळ, इष्टकवच गळयांत नेहमी ठेवण्यासाठीं सोन्याचा एकपेडी गोंफ मात्र तूं तयार करून दिलाच पाहिजे बघ. प्रथमपासूनच मी सांगून ठेवतें बघ.'

जगद्धात्री व्याकूळ स्वरानें म्हणाली, 'मावशी झालं तरी काय? उघड करून सांगितल्यावांचून मी काय समजूं?'

रासमणी किंचित् हंसून म्हणाली, 'अगदीं उघडच करून सांगितलं पाहिजे? सांगतें बापडी! अग तुम्हीं माय लेकरांनीं फार मोठी पुण्याई केली होती, नाहीं तर असं कधीं व्हायचंच नाहीं बघ. मुलीचं लग्न माझ्या हातून कसं होईल म्हणून काळजीनं तूं मरत होतीस पण आतां काय! एकदम राजाची सासू होऊनच बसलीस!'

रासमणीचें बोलणें ऐकून जगद्धात्री तिच्याकडे पाहतच राहिली. तिच्यानें डोळयांची हालचालही करवेना.

रासमणी दयेचा मोठा आव आणून म्हणाली, 'अग, तुलाच आश्चर्य वाटलं असं नाहीं जगो, तें ऐकून मीही अशी पहातच राहिलें होतें. वाटलें, झोंपल्या झोंपल्या एकादं स्वप्न तर पहात नाहीं ना!'

जगद्धात्री म्हणाली, 'उघडपणानं बोल ना मावशी काय झालं तें! मी जमीन अस्मानांत गिरक्या खाऊन टेंकीस आलें आहें!'

इतकें झालें तेव्हां रासमणीनें जगद्धात्रीच्या डाव्या खांद्यावर हात ठेऊन कानाजवळ आपलें तोंड नेलें आणि श्वासनिश्वासाच्या स्वरानें काय तें गुपित सांगून म्हटलें, 'गोष्ट अगदीं या कानाची त्या कानाला नेऊं नको बाळे! आनंदाच्या भरांत सर्वांना सांगत सुटूं नको. नसते अडथळे उत्पन्न व्हायचे एकाद्या वेळीं! चाटुय्येदादाचा जगांत माझ्याशिवाय दुसऱ्या कोणावरही विश्वास नाहीं म्हणून आज सकाळींच हांक मारून मला त्यानें ही गोष्ट सांगितली, आणि म्हटलें, रासू, जगद्धात्रीला हें एवढं सांगून ये ताई! म्हणावं, तूं आतां आपल्या मुलीच्या काळजीनं हंतरूण धरूं नको. माझ्या हातीं सोंपवून दे आणि राजाची सासू होऊन पायावर पाय टाकून निश्चित बैस. मनांत आलं, माझंही हें शून्य वैकुंठधाम मला अगदीं खायला येतं असं वाटत आहे, मुलालाही पाहायला कोणी नाहीं, तेव्हा म्हटलं, जाऊं द्या एका कामांत दोन कामं होऊन जात आहेत. जाईनात का! एका ब्राह्मणाचं कूळ राखल्यासारखं झालं आणि गांवांतील मुलगी गांवांत राहिली. त्या बिचारीलाही ही एवढीच काय ती मुलगी—'

पण राजाच्या भावी सासूच्या तोंडाकडे पहातांच रासमणीला आपलें तें वाक्य पुरें करवलें नाहीं. कारण तिचें तें लांब लचक भाषण ऐकतां ऐकतां जगद्धात्री स्तंभितच होऊन गेली होती.

आणि तो तिचा आविर्भाव पाहून रासमणी गडबडीनें म्हणाली, 'काय झालं ग जगो?'

जगद्धात्रीनें स्वतःचें मन ताळ्यावर आणून एक निश्वास सोडला आणि नंतर म्हटलें, 'छे. तसं कुठचं व्हायला! मावशी, गोलोक मामांनीं तुझी थट्टा केली असेल!'

'थट्टा आणि माझी? इतकं वय झालं; पण थट्टा विनोद कशाला म्हणतात हें मला माहीतही नाहीं! शिवाय बहीण भावांत कधीं असला विनोद होतो!'

तरी पण जगद्धात्री म्हणालीच, 'विनोद तर काय मावशी! असं काय कधीं होईल?'

रासमणी किंचित् हंसली आणि म्हणाली, 'तें खरं मुली? मलाही प्रथम तसंच वाटलं. हें स्वप्नच तर नाहींना मी पाहत अशीही कल्पना झाली. पण लागलीच माझी खात्री झाली. नाहीं. हें स्वप्न नाहीं. मी जागीच आहें. पोरीचं सुदैवच म्हणायचं. नाहीं तर कुलीन मुलीच्या बाबतींत तिचं भाग्य असं कधीं उदयास आलेलं तूं पाहिलं आहेस कीं ऐकलं आहेस? अखंड सौभाग्यवती होवो असा मी तिला आशिर्वाद देतें. पण मी जें सांगितलं तें मात्र आजच झालं पाहिजे बरं. आणि ही गोष्ट षट्कर्णीही होऊं देऊं नको. सुखासुखीं आशिर्वाद होऊन जाऊं दे आधीं.'

जगद्धात्री थक्कच होऊन उभी राहिली.

रासमणीच पुनः बोलूं लागली, या येत्या मार्गशीर्षानंतर म्हणे एक वर्ष मुहूर्तच नाहीं! आणि म्हणूनच माझ्या चाटुय्येदादाची इच्छा—इतकें अर्धवट बोलून तिनें स्मित हास्य केलें आणि नंतर म्हटलें, 'आणि त्याला कां वाटूं नये सांग पाहूं! अग तुझी मुलगी दिसायला लक्ष्मीसारखी सुंदर आहे! लक्ष्मीचीच दुसरी प्रतिमा! पहातांच ऋषिमुनींचं मनही पालटायचं मग चाटुय्येदादा वेडा झाला यांत कसलं आश्चर्य!' हें वाक्य संपल्यावर रासमणीनें हंसून जगद्धात्रीच्या खांद्याला बोटानें दाबलें आणि म्हटलें, 'जा बाई ओलेत्यानं अशी उभी राहूं नको. मीही जातें. उशीर झाला. मग तिसऱ्या प्रहरीं येईन आणखीं. पुष्कळच बोलायचं आहे.'

असें म्हणून मग वेळ न घालवितां ती घाईघाईनें तेथून निघून गेली.

मात्र या अनपेक्षित बातमीनें जगद्धात्रीला चक्करच आली. ती पडत पडत कशीबशी एकदांची घरीं येऊन पोंचली आणि देवघराच्या ओसरीवर दण करून कमरेवरची कळशी ठेवून ओलेत्यानेंच खालीं बसली. बसतां बसतां तिचे दोन्ही डोळे अश्रूंनीं भरून आले.

तिची तेवढीच एकुलती एक मुलगी! अतिशय लाडकी संध्या. रूपागुणांनीं खरोखरच लक्ष्मीची प्रतिमा! अशा या प्रतिमेला विसर्जन–समर्पण–करण्याचें बोलावणें काय गोलोक चाटुर्य्याच्या नरककुंडांत यावें!! जो गोलोक मुलीच्या आजोबाहूनही वयानें मोठा तो गोलोक वर म्हणून पुढें यावा, आणि त्याला तिचें दान करावें त्यापेक्षां तिला यमाच्या हातीं सोंपविणें काय वाईट! ती मेलेली पहाणें बरें!

जगद्धात्रीच्या अन्तःकरणांत हे विचार अग्नीच्या ज्वालाप्रमाणें धडाडूं लागले; पण तोंडानें मात्र 'नाहीं' असें तिला उच्चारतां येईना. कारण ती स्वतःच कुलीन कुल सर्वस्व अशा ब्राह्मणाची मुलगी होती. त्या समाजांत आणि तसल्या कुटुंबांत मुलीचें असें समर्पण होणें विचित्र नव्हतें. इतकेंच नव्हे तर कुलीनांच्या मुलींची याहूनही अत्यंत खेदकारक होणारी दुर्गति तिनें पाहिली होती. स्वतः डोळ्यांनीं हे प्रकार तिला पहावे लागले होते. त्यामुळें स्वतःच्या मुलीबद्दल तसले विचार मनांत येऊन जरी तिचें अन्तःकरण जळूं लागलें तरीही ही गोष्ट असंभवनीय आहे असा निर्वाळा देऊन अगर पेटणारा शोकाग्नी शांत करून मोकळी होण्याला तिला एक टिपूसभर पाणीही कुठें आढळेना. शोधूनही भरंवशाचें स्थळ तिला दिसेना. ती एकटीच न बोलतेपणानें बसून आपले अश्रू आपणच पुसूं लागली. आणि मनांत म्हणूं लागली कीं लवकरच ही भीषण भवितव्यता सत्यसृष्टींत आलेली मला पहावी लागणार. कदाचित् त्याच कुत्सित थेरड्याच्या दुर्निवार वासनेला अडथळा करण्याचा कोणताच मार्ग आपणाला सांपडणार नाहीं. त्या दिवशींचें त्याचें कुतुहलात्मक विनोदी वाटणारें बोलणें, संध्येला त्यानें दिलेलें आव्हान पुनः पुन्हां तिला आठवूं लागलें. त्यांत त्यावेळीं इतकें जालिम जहर सांठविलेलें होतें असा तिला संशयही आला नव्हता.

याच वेळीं सदर दरवाजानें, कसलेसें एक पत्र वाचण्यांत गढून गेलेली संध्या एकेक पाऊल टाकीत आंत आली. अजूनही तिचें तें पत्रवाचन बहुधा

संपलें नसावें. त्यामुळें इकडे तिकडे कुठेंच न पहातां ‘ आई, आई ग ’ अशी तिनें हांक मारली.

जगद्धात्रीनेंही घाईघाईनें डोळे पुसून ‘ काय ग बाळे ’ असें उत्तर दिलें.

आईच्या आवाजांतील भावना मुलीला आणि मुलीच्या आवाजांतील वेदना आईला तेव्हांच जाणवतात.

संध्येचेंही तसें झालें. आईच्या या उत्तरानें तिचा आवाज तिला भाराव-लेला वाटला, तिनें चमकून तिच्याकडे पाहिलें, हळूहळू ती जवळ आली आणि विचारूं लागली, ‘ काय झालं आई ? ’

मुलीच्या तीक्ष्ण नजरेच्या माऱ्यांतून स्वतःला वांचविण्यासाठीं तिनें दुसरीकडे पाहून उत्तर दिलें, ‘ छे. कांहीं नाहीं ! ’

आतां तर संध्येची खात्रीच झाली. तिनें जवळ बसून आपल्या पदरानें तिचे डोळे पुसले आणि करुण स्वरानें विचारलें, ‘ आई, बाबांनीं कांहीं केलं काय ग ? ’

जगद्धात्रीनें फक्त ‘ नाहीं ’ एवढेंच त्रोटक उत्तर दिलें.

पण मुलीचा त्या उत्तरावर विश्वास बसेना. हळूहळू ती तिला अगदीं खेटून बसली आणि म्हणाली, ‘ जगांत सगळयाच गोष्टी मनुष्याच्या मना-प्रमाणं होतात असं नाहीं आई ! सगळे लोक माझ्या बाबांना वेडा बामण म्हणतात. मग आई, तूही त्यांना आपल्या मनांत तसं कां समजत नाहींस ग !

‘ लोक म्हणतील, मानतील पाहिजे तें करतील. त्याचं काय त्यांत नफा-नुकसान आहे ? माझ्यासारखा त्यांना त्रास नाहीं सहन करावा लागत संध्या ! ज्याचं जळतं त्याला कळतं बरं ! ’ जगद्धात्री म्हणाली.

हा नफातोटा कोणाचा कसा व आणि त्यासाठीं कोणाचें काय जळत आहे, त्यामुळें कोणाला कुठें व कशा वेदना होत आहेत याचा विचार संध्येनें कधीं केला नव्हता आणि केला असता तरी त्याचा उलगडा तिला झाला नसता. आजही तिला तो झाला नाहीं. साध्या सरळ मनाचा, कोणाशीं कधीं विरोध न करणारा, अल्पबुद्धि असला तरी दुसऱ्याच्या थोड्याशा दुःखानेंही तळमळणारा, कळवळणारा असा बाप आहे. आणि अशा देव-माणसाला सर्वांनीं नांवें ठेवावीं याचें तिला पराकाष्ठेचें दुःख झालें. तिचे डोळे अश्रूंनीं भरून आले. पितृभक्तीमुळें तिचें अन्तःकरण कळवळलें. सम-वेदनांनीं ती व्याकूळ झाली.

तिनें आईला म्हटलें, ' आई, जर माझ्या हातीं असतं, देवानं मला तितकं सामर्थ्य दिलं असतं, तर बाबांना कुठंही रानावनांत, कडेकपारींत घेऊन निघून गेलें असतें. त्यांच्यामुळं जगांत कुणाला त्रास आणि दुःख सहन करावं लागलं नसतं अशीच निर्जन जागा मी पाहिली असती. माझे बाबा किती अल्पसंतोषी, दयाळू आणि परोपकारी आहेत ! '

जगद्धात्रीनें चटकन् आपल्या मुलीच्या गालाला हात लावून तिचा मुका घेत प्रेमभरानें म्हटलें, ' इडा पिडा टळो आणि आपत्ती पळो ! असं कुठं झालंय पोरी. पण काय ग, मी मात्र तुझी सावत्र आई होय ? त्यांच्या अर्ध्यानं जरी आई म्हणून माझ्यावर तुझी ममता असती संध्या—'

संध्या मध्येंच म्हणाली, ' आई, मी तुझ्यावर ममता करीत नाहीं होय ? माझ्या मातृभक्तीस तूं अशी नांवं ठेवतेस ? '

' तसं नाहीं मी म्हणत; पण त्यांच्यासाठीं तूं जितका जीव टाकतेस, तुझं मन जितकं तळमळतं, त्यांच्या पायाला खडा कांटा बोंचला तर स्वतःच्या हृदयाला टोंचल्यासारख्या वेदना होतात, तसं कांहीं माझ्यासाठीं तुला होत नाहीं. हेंच पहाना, त्यांच्या औषधानीं गुण येत नाहीं हें तुला चांगलं माहीत आहे; पण दुसऱ्या कुणाचं औषध तूं घेत नाहींस. तसं केलं तर त्यांचं मन दुखवेल असं तुला वाटतं. स्वतः मरून वडलांना जगविण्याची ही तुझी कला काय मला कळत नाहीं संध्या ? '

संध्येनें दोन्हीं हातांनीं आईच्या गळ्याला मिठी मारून हंसत हंसत म्हटलें, ' असं होय ! अग बाबांसारखा डॉक्टर कुठं जगांत आहे तरी ? '

आईनें उत्तर दिलें, ' नाहीं. तूं अगदीं खरं तेंच बोललीस ! '

आईच्या उपहासगर्भ बोलण्याचा संध्येला राग आला. ती रुसव्यानें म्हणाली. ' जा. तुला आपलं थट्टेशिवाय कांहीं दिसतच नाहीं ! तूं अशी थट्टा करूं नको त्यांची ! माणसाला झालेला आजार काय एका दिवसांतच बरा होतो वाटतं ? मला तर आतां पूर्वीपेक्षां कितीतरी चांगलं वाटत आहे ! '

आणि तें बोलणें तितकेंच थांबवून तो वादाचा विषय टाळण्यासाठीं ती आईला म्हणाली, ' दुल्याची बायको–मुलगी निघून गेली आई. सुटलीं एकदाचीं ! '

' केव्हां गेलीं ? '

' कोण जाणें ! पण बहुधा मोठ्या पहांटेसच तीं गेलीं असावीं. '

या बाबतींत असलेलें मुलीचें कृत्रिम औदासिन्य आईला फसवूं शकलें नाहीं. तिनें विचारलें, 'कुठं गेलीं ठाऊक आहे तुला?'

संध्या पूर्वीच्याच त्या 'मला काय त्याचें!' या आविर्भावानें म्हणाली, अरुणदादाच्या पिछाडीला असलेल्या बागेंत गेलीं असावींत. अरुणचा उडिया माळी ज्या जळक्या पडक्या घरांत राहत असे तें ओसाड घर आहेना? त्यांतच असेल!'

जगद्धात्रीनें विचारलें, 'त्यांना अरुणाकडे कुणी पाठविलं ग? तूं वाटतं!'

या प्रश्नाचें उत्तर द्यायचें म्हणजे संध्येला मनांतल्या मनांत एक संकटच वाटलें. तरीपण 'नरो वा कुंजरो वा' या न्यायानें खऱ्याखोट्याचें मिश्रण करून ती म्हणाली, 'अरुणदादाकडे त्यांना मी कशाला पाठवायला जाऊं आई? मी नाहीं कुणाला कुणाकडे पाठविलं!'

आणि इतकेंच बोलून भलत्याच विकृत स्वरूपाला पोंचणारा तो प्रसंग टाळलेला बरा असें मनांत ठरवून तिनें गडबडीनें हातांतील पत्र उलगडून म्हटलें, 'अग, पण तुला जी महत्त्वाची गोष्ट म्हणून सांगायला आलें ती तशीच राहिली. बोललेंच नाहीं मीं!! काशीवास पत्करून विरक्त झालेली माझी आजी आतां तिकडून खरोखर इकडे येत आहे. तिनें तसें स्पष्टच लिहिलें आहे. आई, ती कधीं खोटं बोलायची नाहीं, नाहीं ग! मला वाटतें यावेळीं आमच्यावर तिची मोठीच कृपा दिसते.'

जगद्धात्रीनें उत्सुकतेनें विचारलें, 'आईचं पत्र? आश्चर्यच! सासूबाईनीं कधीं येतों म्हणून लिहिलें आहे?'

तिची काशी क्षेत्रीं राहत असलेली विरक्त सासू काशी सोडून एका दिवसासाठींही दुसरीकडे कुठें जाण्याला तयार नसे. पण यावेळीं जगद्धात्रीनें तिला लिहिलें होतें कीं, 'आपल्या एकुलत्या एक असलेल्या नातीच्या विवाहासाठीं आपण आलें पाहिजे. इतकेंच नव्हे तर आपल्याच हातून कन्यादानाचें उदक सुटलें पाहिजे. सासूनें पाठविलेल्या उत्तरांत कन्यादान करण्याबद्दल वगैरे नापसंतीच दर्शविली होती पण लग्नाच्या वेळीं मी अवश्य येईन असें लिहिलें होतें.

अर्थात् स्वतःच्या लग्नाबद्दलची हकीकत स्वतःच वाचून दाखविणें संध्येला संकोचाचें वाटल्यामुळें ती म्हणाली, 'तुझ्या पत्राचें उत्तर तूंच वाच ना आई!' असें म्हणून तिनें तें पत्र आईच्या पुढ्यांत ठेविलें आणि त्याच वेळीं

अस्वस्थ होऊन म्हटलें, 'हें ग काय आई! तूं अजून ओलेत्यानेंच बसून आहेस? धांवत जाऊन आधीं मी तुझं लुगडं घेऊन येतें.' आणि हें वाक्य संपतें न संपतें तोंच ती धांवत गेलीही.

जगद्धात्रीनें तें पत्र उचललें आणि 'सून म्हणून तरी इतक्या दिवसांनीं माझी दया आली म्हणायची.' असें म्हणून आदरानें मस्तकाला लावलें. नंतर उठून देवघरांत जाण्यासाठीं ती हळूहळू निघाली होती तोंच प्रियनाथ-बाबू—तिचा नवरा—जोराजोरानें बडबडत आंत आले. त्यांच्या त्या बडबडण्यांतून 'दोन दिवस गेलों नाहीं. हो दोनच दिवस झाले मला जाऊन पण तितक्यांत हायपोकंड्रियाची चांगलीच वाढ झालेली दिसते!'

नवराबायकोच्या संभाषणाचे योग फारच क्वचित् येत. जगद्धात्रीच आपण होऊन बोलत नसे; पण त्यांची ती धांदल आणि विशेष म्हणजे बारा वाजण्यापूर्वी घरीं येणें हें पाहून तिला मनांतल्या मनांत कांहींसा विस्मय वाटला आणि त्यांच्याकडे पहात शांत स्वरानें तिनें विचारलें, 'कुणाला काय झालं?'

प्रियबाबूंनीं उत्तर दिलें, 'अरुणाला. अगदीं बरोबर हायपोकंड्रियाच तो. मी ठरविलेल्या निदानांत बदल करणें कुणाच्या बापालाही साध्य नाहीं. तो विपिनच सांगू देना याचा अर्थ काय तें?

दुसरा एकादा प्रसंग असता तर बहुधा जगद्धात्रीनें आणखीं प्रश्न विचारलाच नसता पण अरुणाचें नांव ऐकून ती कांहींशी उद्विग्न होऊन म्हणाली, 'काय झालं आहे अरुणाला?'

'अग हें आतांच सांगितलं ना! बाकी विपिनलाही कळणार नाहीं तें तुला कुठचं कळायला म्हणा! पण कांहीं असलं तरी तो प्रॅक्टिस बिक्टिस करण्याच्या तयारींत असावा. सामान सुमान बांधून झालं. घरदार जमीन जुमला विकण्याच्या तयारींत आहे. हराणकुंडू याला तसें कळविलेंहीं आहे. दैवयोग म्हणून मी तेवढ्यांत तिथं गेलों. जिकडे मीं जाणार नाहीं, जिकडे माझी नजर वळणार नाहीं तिकडे कांहीं ना कांहीं तरी अघटित घडून आलेलं असायचंच. छे. इतक्या सगळीकडे नजर ठेवण्यांत मला जगणंही मुष्कील व्हायचं बाबा! संध्ये, तूं, कुठं गेलीस आणखी? चटकन मटेरिया मेडिका घेऊन ये बरं. एक रेमिडी सिलेक्ट करून त्याला नेऊन देतों. त्याच्या पोटांत औषध पोंचल्याशिवाय डोकें ताळ्यावर येणार नाहीं!'

'आलेंच बाबा' असें म्हणत एक भलें लठ्ठ पुस्तक हातांत घेऊन संध्या त्यांच्या जवळ येऊन उभी राहिली.

जगद्धात्री तितक्यांत रागावून म्हणाली, 'पाया पडतें तुमच्या काय कोळसें, रखा झालं तें एकदाचं उघड करून सांगाना.'

या बोलण्यानें प्रियबाबू चमकले आणि नंतर लागलीच म्हणाले, 'तेंच. काय सांगूं? हायपो—मानसिक व्याधि—आज उद्यां इतक्यांतच तो या आपल्या गांवांतून निघून जातों म्हणतो. हराण कुंडूला सगळं खरेदी द्यायचं त्यानं ठरविलं आहे. छे. पण असं होतां कामा नये. मी तसं होऊं देणारच नाहीं. दोनशें शक्तीचा एक डोस—'

संध्येचा चेहरा अगदीं निस्तेज खिन्न होत चालला. पण ती कांहीं बोलली नाहीं. खालीं मान घालून मुकाट्यानें उभी राहिली. जगद्धात्री मात्र व्याकूळ स्वरानें म्हणाली, 'घरदार जमीनजुमला विकून निघून जाणार अरुण? त्याला वेड तर लागलं नाहीं?'

प्रियनाथबाबू हात पुढें करून समजावून देऊं लागले, 'ते म्हणाले, 'अंहः तसं नव्हे. तें नव्हे. खात्रीनें हायपोकंड्रिया आहे. हें वेड नव्हे. इन्सॅनिटि म्हणतात त्याला. त्याचें औषध वेगळें आहे. आतां विपिन असता तर तो हेंच ठरविता; पण—'

जगद्धात्रीनें एकवार मुलीकडे नेत्रकटाक्ष फेंकला आणि नवऱ्यानें चालविलेल्या एकसारख्या बडबडीला जोरदार आवाजानें प्रतिबंध करून अत्यंत स्पष्ट स्वरानें म्हटलें, 'तुमचें स्वतःचें आत्मचरित्र ऐकण्याला मला वेळ नाहीं. अरुण काय हा मुलुख सोडून अगदीं जाणारच म्हणतो?'

'म्हणतो? अग त्याची सगळी तयारीही झाली! मी गेल्यामुळं—'

'पुन: मी? अरुण कधीं जाणार?'

प्रिय कांहींसें ओशाळून म्हणाले, 'कधीं? आज जाईल. कदाचित् उद्यांही जाईल! फक्त हराण कुंडू—'

जगद्धात्रीनें विचारलें, 'हराण कुंडू काय सगळेंच विकत घेणार?'

'खात्रीनें, निश्चित. तो बेटा तर तेवढीच वाट पहात आहे. मातीमोलानं जर त्याला एवढी संपत्ति मिळाली—'

जगद्धात्रीनें पुन: प्रश्न केला, 'ही गोष्ट गांवांत आणखीं कुणाला समजली आहे?'

'कोणाला नाहीं. एका माणसालाही कळलेली नाहीं. सुदैवानें केवळ मीच—'

'तुमच्या सुखसौभाग्याच्या गोष्टी ऐकण्याची मला हौस नाहीं. पण तुम्हीं त्याला एकवार बोलवून आणाल ? तुझ्या काकीनं तुला म्हणावं अगत्यानं बोलविलं आहे !

अजूनपर्यंत संध्या एक अक्षरही बोलली नव्हती. फक्त त्या दोघांचें भाषण ऐकत खालीं मान घालून उभी होती पण या वेळीं मात्र तिनें वर मान करून त्यांच्याकडे पाहिलें. तिचा चेहरा यावेळीं निस्तेज झाला होता. त्याच्यावर पांडुरता आली होती. तिला बोलायला म्हणून तोंड उघडलें त्यावेळीं तिचे ओंठही थरारत होते. पण तिकडे लक्ष न देतां ती दृढ स्वरानें म्हणाली, 'कां ग आई,' त्याची तूं वारंवार मानखंडना करतेस ? त्यानं तुझा असा काय अपराध केला आहे तो तरी ऐकूं दे.'

जगद्धात्रीला अतिशय आश्चर्य दाटल्यामुळें तिनें विचारलें, 'त्याची मानखंडना कुणाला करायला हवी ? तूं काय बोलतेस हें संध्या ?'

'तें कांहीं असो. पण तूं या घरांत कांहीं केल्या त्याला बोलवितां कामा नये.'

'पण मी म्हणतें, त्याला इथं बोलवून हिताच्या दोन गोष्टी सांगायला हरकत आहे ?'

'हित असो वा नसो. त्याचं बरं वाईट कांहीं होवो. तो राहो अथवा न राहो. घरदार विकून टाकूं दे नाहीं तर तसंच ठेवूं दे. आमच्याशीं त्याचा तसा काय संबंध आहे, सांग इथं जर तूं त्याला बोलवून आणलंस आई, तर तुझी शपथ घेऊनच सांगतें मी खरोखरच त्या पुष्करणींत उडी घेऊन जीव देईन.' बोलतां बोलतां ती तेथून इतक्या घाईनें निघून गेली कीं आईकडून उत्तर मिळण्याची तिला आवश्यकताच वाटली नाहीं !

जगद्धात्री विस्मयातिरेकानें दोन्हीं डोळे मोठे करून पहातच उभी राहिली ! प्रियबाबू ओरडून म्हणाले, 'अग, तें तेवढं पुस्तक देऊन जा ना. उशीर झाला. चटकन एकादी रेमिडी सिलेक्ट करून टाकूं दे ना संध्या.'

संध्या मागें फिरली आणि हातांतील पुस्तक बापाच्या पायांशीं ठेवून निघून गेली. प्रियबाबू तिथेंच बसून औषध शोधून काढण्यासाठीं पुस्तक चाळूं लागले.

जगद्धात्री कांहीं वेळ निःशब्द उभी राहिली; पण नंतर नवऱ्याला उद्देशून म्हणाली, 'तुम्हीं काय मुलीचं लग्न करायचं नाहीं असं ठरविलं आहे ?'

वाचण्याचें काम चाललें असतांच प्रियबाबूंनीं उत्तर दिलें, 'कां! लग्न करायचं तर. अवश्य करायचं!'

'कधीं करणार! शेवटीं भलतंच कांहीं झालं म्हणजे करणार!'

'हं.'

जगद्धात्री कांहीं वेळ स्वस्थ राहिली. नंतर मनाशींच कांहीं तरी ठरवून तिनें विचारलें, 'रसिकपुरला जाल का एकदां?'

पुस्तकाच्या उघड्या पानावर एके जागीं बोट ठेवून प्रियबाबूंनीं आपल्या पत्नीकडे पहात विचारलें, 'रसिकपुराला? कुणाला काय झालं आहे? कुणी कांहीं येऊन कळविलं वाटतं? केव्हां कोण आला होता?'

एक निश्वास सोडून जगद्धात्री म्हणाली, 'जयराम मुखय्याच्या नातवाशीं या बाबतींत बोलणं झालं होतं. तेव्हां जा ना. एकदां त्या मुलाला पाहून तरी या.

'पण मी जाऊं केव्हां? तूंच पहाना. मी क्षणभर इथं नसलों तर कांहींच्या बाहींच होऊन जातं! अरुणाची ही स्थिती! त्यांतच चाटुय्ये महाशयांकडून बोलावणं आलंच आहे. त्यांची मेहुणी म्हणे आजारी आहे!'

जगद्धात्रीनें कांहींशा विस्मयानें विचारलें, 'कोण ज्ञानदा आजारी आहे? तिला काय झालं आणखीं?'

'आम्ल पित्त. दुसरं काय? खाण्यांत कमजास्त झालं म्हणजे अजीर्ण होतं! वांती होते असं वाटतं. पोटांत मळमळत आहे. अरुणाकडे जाऊन तिथून तिकडे जाईन आणि एक डोस—'

तिला औषध द्यायला पुष्कळ लोक आहेत! तुमच्या पायां पडतें. एकदां रसिकपूरला जाच. मुलाला पाहून एकदाचं स्थळ निश्चित करा. आतां पोरीचं हें कार्य ठेवून उपयोगी नाहीं.'

पत्नीच्या सद्गदीत स्वरानें व अश्रुभाराक्रांत चेहऱ्यानें प्रियबाबू कांहींसे भानावर आले आणि म्हणाले, 'पण तो मुलगा अगदींच वाह्यात आहे! नेहमी भांगेच्या तारेंत—'

आतां मात्र जगद्धात्रीला धीर धरवेना. ती अकस्मात् हुंदके देऊन रडत म्हणाली, 'असूं दे भांगेच्या नशेंत. वाह्यात असला तरीही हरकत नाहीं. दोन दिवस मुलीच्या कपाळभर कुंकूं लागलेलं तरी पाहीन! आणि तुम्हीं तरी काय? तुमच्या हातीं जर मला माझ्या आईबापांनीं बिनहरकत सोंपविली तर तुम्हांला आपल्या पोरीच्या बाबतींत तसं करायला काय हरकत आहे?'

आणि इतकें म्हणून पदरानें डोळे पुशीत पुशीत ती तेथून जलद पावलें टाकीत आंत निघून गेली.

प्रियबाबू थक्क होऊन क्षणभर आपल्या पत्नीकडे पहातच राहिले. नंतर पुस्तक झांकून एक सुस्कारा सोडून म्हणाले, 'दोन दोन अत्यावस्थ रोगी हातीं धरलेले! अशा या घालमेलींत औषध तरी कसं निश्चित करावं?' बोलतां बोलतां पुस्तक मिटून त्यांनीं तें बगलेंत मारलें आणि हळूहळू बाहेर निघून गेले.

*　　　*　　　*

## ८

स्नान पूजा आन्हिक आणि यथाविहित सात्त्विक उपाहार आटोपून मूर्तिमान ब्राह्मण्यच कीं काय अशा वेशांत गोलोक चतर्जी महाशय हळू हळू खालीं आले. वास्तविक या वेळीं ते सरळ बाहेर बैठकीच्या दिवाणखान्यांत जावयाचे. आणि तसे ते निघाले होतेही पण अकस्मात् त्याच वेळीं त्यांच्या मनांत काय आलें कुणाला ठाऊक! ते एकदम मागें वळले आणि जवळच्या पडवीला वळसा घालून स्वयंपाक घराच्या दारांत येऊन उभे राहिले. आणि त्याच वेळीं अभिनय कुशल चाटुर्ये महाशयांनीं स्वतःचा खुषींत असलेला चेहरा उद्वेगपूर्ण उदासीन करून म्हटलें, 'अं! हें सगळं काय चाललं आहे तुझं? तूं आजारी. मग आतांच या असल्या कामाची काय आवश्यकता आहे? हे श्रम तूं नाहीं केलेस तर नाहीं का चालणार? तुला मी नेहमी हेंच सांगत असतों. आधीं शरीर कीं आधीं काम?'

या वेळीं ज्ञानदा विळा घेऊन भाजी चिरीत होती. ते आले आणि बोलले तरी तिनें हातचें काम काहीं थांबविलें नाहीं. चालतांना चटचट वाजणाऱ्या खडावांचा आवाज जसा ऐकूनही तिनें ऐकला नाहीं तसाच त्यांचा उत्कंठित अनुयोगही—आग्रहाची विनवणीही—तिच्या कानांत प्रवेश करूं शकली नाहीं.

गोलोक क्षणभर स्तब्ध राहून नंतर म्हणाले, 'आहे काय हा प्रकार? आज सकाळीं तुझं कसं काय होतं?'

तोंड वर न करतां ज्ञानदा खालच्या मानेनेंच हातांतील वांगें चिरीत राहिली. मात्र एकदांच मान हालवून 'बरं आहे' असें सुचविण्याला ती विसरली नाहीं.

समाधानयुक्त चेहऱ्यानें गोलोक म्हणाले, ठीक. ठीक. मला तें माहीतच आहे. प्रियनाथला लोक वेडा म्हणेनात कां पण औषध देण्यांत तो धन्वंतरी खरा! मात्र त्यानं जसं सांगितलं असेल तसं वेळच्या वेळीं औषध घेत जा. हलगर्जीपणा अथवा चालढकलपणा करून चालणार नाहीं. सांगून ठेवतों.'

ते इतके बोलले तरी ज्ञानदानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. खालीं पाहून ती हातचें काम करीत होती.

गोलोक कांहीं वेळ तिच्याकडे पाहत राहून नंतर म्हणाले, 'प्रियनाथला अगत्यानं सांगून ठेविलं आहे मी. दोन वेळ येऊन पाहून जा म्हटलं. सकाळीं आला होता ना?'

ज्ञानदा पूर्वीप्रमाणेंच मान हालवून निशब्दतेनें 'होय' म्हणाली.

खूष होऊन गोलोक म्हणाले, 'येईल म्हणजे, आलाच पाहिजे. येईलच. माझ्या अगदीं आज्ञेंत आहे तो' पण बेटी मोलकरीण गेली कुठं? तो औषध देऊन जाईल आणि तूं इकडे काम कर करून शरीराचं मातेरं करून घेशील!! मी तसं अगदीं होऊं देणार नाहीं बघ. हीं सगळीं माणसं गेलीं कुठं सांग? राहूं दे ते सगळं पडून तिथंच. जा. वर जाऊन आधी थोडी विश्रांति घे. मधुसूदना! तूंच माझा पाठिराखा. तुझ्यावरच माझा भरिभार—' असें म्हणून गोलोक महाशय दुसऱ्याचे आणि स्वतःचे लौकिक आणि पारलौकिक अशीं दोन्हीं कर्तव्यें बहुतेक संपवून त्यांनीं बाहेर जाण्यासाठीं पाऊल फिरविलें.

तितक्यांत खडावाच्या झालेल्या त्या एवढ्याशा आवाजानें चकित होऊन ज्ञानदा त्यांच्याकडे पाहूं लागली. तिनें खालीं घातलेली मान वर केली. तिच्या त्या चेहऱ्यावर त्या दिवशींचें हास्य आणि प्रसन्नता आज थोडीसुद्धां दिसत नव्हती. चिंता आणि विषाद यांनीं तिचें तोंड काळवंडलें होतें. काळजीच्या घनदाट मेघांनीं तिचा चेहरा झांकून टाकला होता. डोळे आरक्त झाले असून त्यांचे कोंपरे अजूनही अश्रूंनीं ओलावलेले दिसत होते. तीच सजल दृष्टी गोलोक महाशयांच्या फिरल्या चेहऱ्यावर स्थिरावून गहिंवरलेल्या गाढ स्वरानें तिनें त्यांना विचारलें, 'तुम्हीं काय प्रियनाथ बाबूंच्या संध्या नांवाच्या मुलीबरोबर लग्न करायचं ठरवलंय? मला फसवूं नका. खरं सांगा.'

त्या प्रश्नानें गोलोकना अवघडल्यासारखें झालें. एकदोनदां त्यांनीं आंवढा गिळला; पण एकदम कांहीं त्यांना उत्तर देतां येईना. पण दुसऱ्याच क्षणीं ते म्हणाले, ' मी ? संध्येबरोबर ? छे: कोण सांगतं ? '

ज्ञानदा म्हणाली, ' कोणी का सांगेना. रासू आक्काला तुम्हीं संध्येच्या आईकडे पाठविली होती ? येत्या मार्गशीर्षांत करण्याचं निश्चित झालं आहे ना ? देवाची शपथ आहे तुम्हांला. खरं काय असेल तें सांगा. '

गोलोक अस्पष्ट आवाजांत धमकावण्याच्या स्वरानें म्हणाले, ' रासी भटीण तसं बोलून गेली होय ? बरं आहे. पहातों तिला ! मी—'

ज्ञानदा मध्येंच म्हणाली, ' मग माझा हा असा सर्वस्वी घात तुम्हीं कां केला ? कुणाला तोंड दाखविण्याला किंवा कुणासमोर उभं राहण्याला मला आतां कुठंही जागा राहिली नाहीं—' बोलतां बोलतां आपल्या विकृत आणि गुदमरलेल्या स्वरानें टाहो फोडून रडूं लागली. सहस्रश: तारा एकदम तुटाव्या त्याप्रमाणें तिचा तो आवाज झणाणून उठला. अखेरचें आकांताचें रडणें होतें तें तिचें.

त्या रडण्यानें गोलोक अगदीं काकुळतीला आले आणि भीत भीत चोहोंकडे पाहून हातानें तिला थांबवीत दबलेल्या स्वरानें म्हटलें, ' हें काय ? तूं काय करीत आहेस हें ? लोकांनीं ऐकलं तर ते म्हणतील काय ! तोंड मीट. तोंड मीट. तूं ऐकलेली गोष्ट साफ खोटी आहे. अगदीं खोटीच आहे ग ! केवळ थट्टा—'

ज्ञानदा रडत रडतच म्हणाली, ' नाहीं. असली ही थट्टा कधींच असूं शकणार नाहीं. खोटं नव्हेच मुळीं तें ! अगदीं खरं खरं आहे. तुम्हीं काय पाहिजे तें करूं शकाल. तुम्हाला असाध्य असं कांहींच नाहीं—'

' छे. छे. तसं नाहीं तें. थट्टा मस्करींत बोलून गेलों असेन. अग ती मला नात शोभेल ! अरेरे ! तुझी अगदींच चुकीची समज झालेली दिसते ! चुप. चुप ! छे. इतक्यांत इथं आणखी कोणी तरी नोकर चाकर यायचे—' बोलतां बोलतां गोलोक महाशय चट्‌चट् खडावा वाजवीत तेथून एकदांचे तोंड घेऊन पळून गेले.

ज्ञानदाच्या हातांतील चिरलेलें वांगें जसेंच्या तसेंच राहिलें. तिनें पदराचा बोळा स्वत:च्या तोंडांत कोंबून, उफाळून येणारें रडें आंवरून धरण्याची जिवापाड मेहनत चालविली.

आणि तितक्यांतच घरांतील दासी धांपा टाकीत येऊन म्हणाली, ‘मावशी, मोलकरणीला बरोबर घेऊन आंधळेदादा महाशय स्वतां आले आहेत.’

ज्ञानदेनें घाईघाईनें डोळे पुसून जिज्ञासू नजरेनें दासीच्या तोंडाकडे पाहिलें. तिच्या अश्रूपूर्ण व्यथित दृष्टीकडे पाहून दासी लाजली. थोडासा विस्मयही वाटला. पण उत्तर देणें भाग असल्यामुळें ती म्हणाली, ‘तुमच्या घरच्या त्या जुन्या पुराण्या दासीच्या सोबतीनें तुमचे सासरे इथं आले आहेत मावशी! झालं काय? असं काय करतां?’

दासीच्या तोंडची ती बातमी ऐकतांच ज्ञानदेच्या फिक्कट चेहऱ्यावरील रक्ताचा थेंबन् थेंब आंतल्या आंत सुकून गेला. तोंड पांढरें फटफटीत दिसूं लागलें. समोरासमोर आलेल्या प्रत्यक्ष मृत्यूलाही पाहून इतकं कोणी घाबरत नसेल.’

दासी भिऊन म्हणाली, ‘असं काय झालं मावशी?’

ज्ञानदेनें याही तिच्या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. शून्य आणि व्याकूळ नजरेनें ती फक्त पहात राहिली.

दासीनें पुन: विचारलें, ‘मावशी, तुम्हांला अकस्मात् कांहीं आजार झाला कीं काय?’

आतां कुठें ज्ञानदा भानावर आली आणि मान हालवून म्हणाली, ‘होय. पण बाबांना येऊन कितीसा वेळ झाला ग काली?’

‘तें कांहीं मला माहीत नाहीं. पुढच्या ओटीवर उभे राहून घर मालकांशीं बोलत असलेले मी आतांच पाहिले.’

ज्ञानदेला आश्चर्य वाटलें. तिनें विस्मयानें पहात दासीला विचारलें, ‘मालकांबरोबर?’

‘होय. मी बाहेरून येत होतें, तितक्यांत ते मला हांक मारून म्हणाले, काली तुझ्या मावशीला सांग, तुझे सासरे तुला न्यायला आले आहेत. अगबाई, हे आंतच आले पहा.’ असें म्हणून चटकन ती बाजूला झाली. आणि दुसऱ्याच क्षणीं हातांतील काठीचा ठक ठक आवाज ज्ञानदेला ऐकूं आला. आणि तिनें जाणलें कीं, डोळ्यांपेक्षां हातांतील काठीकडेच मार्गदर्शनाचा भार सोंपवून चालणारे आपले मामंजी आंत आपल्यासमोर येऊन दाखल झाले आहेत. एका बाईच्या मागून काठीनें मार्गाचा माग काढीत एक अत्यंत वृद्ध व्यक्ती तेथें आली. ते ज्ञानदेचे सासरे होते. त्यांनीं मोठ्यानें हांक मारून विचारलें, ‘सुनबाई, कुठं आहेस ग? बाळे इथंच आहेस का?’

ज्ञानदा चटकन उठली आणि पदर सांवरून तिनें आपल्या सासऱ्याच्या पायांवर डोकी ठेविली आणि नंतर ती खालीं मान घालून बाजूला उभी राहिली. म्हाताऱ्यांत दृष्टिदोष असला तरी ठोकळ मानानें चेहऱ्यावरून मनुष्य कोण आहे एवढें त्याला कळत असे. आशिर्वाद देतांना गहिंवरून त्यानें म्हटलें, ' आम्हां म्हातारा म्हातारीला तिथं टाकून आलीस आणि विसरलीस वाटतं बाळे ? तसं नसतं तर इथं कशी राहिली असतीस ? '

आणि याच वेळीं बरोबर असलेली बाई ज्ञानदेला नमस्कार करून म्हणाली, ' खरं आहे तें बाई. तुमची सासू अगदीं मरणाच्या दारीं पडली असून सारखी तुमची आठवण काढीत आहे. माझ्या सूनबाईला घेऊन या. माझ्या सूनबाईला घेऊन या—असा सारखा घोशा चालविला आहे. सारं घरदार विसरून इतके दिवस तुम्हीं इथ राहिला कशा याचंच नवल वाटतं ! खरंच म्हातारा म्हातारीची तुम्हाला आठवणच नसावी.'

सासऱ्यानें केलेल्या या आरोपाबद्दल ज्ञानदेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. केवळ एका हातानें स्वतःचे अश्रू पुशीत पुशीत दुसऱ्या हातानें वृद्ध सासऱ्याचा हात धरून त्याला तिनें मधल्या पडवींत आणलें आणि तेथें स्वतःच्या हातांनीं आसन पसरून त्यावर तिनें त्याला हळूंच बसविलें. आपण कांहीं न बोलतां मान खालीं घालून जवळ उभी राहिली.

आसनावर बसल्यानंतर वृद्ध सासरा तिला म्हणाला, ' चातुर्ये महाशयांना मी दोन पत्रें पाठविलीं. पण एकाचेंहि मला उत्तर मिळालें नाहीं. वाटलें, ते मोठे लोक त्यांना कामें पुष्कळ. माझ्यासारख्या गरिबाला उत्तर पाठविण्याची त्याना आठवण तरी कशाला होते ? पण मुली, तू तर माझ्यासारख्या दीन दुःखी गृहस्थाच्या घरची लक्ष्मी—

जी दासी त्यांच्याबरोबर आली होती ती म्हाताऱ्याचें वाक्य संपण्यापूर्वींच एकदम मध्येंच म्हणाली, ' आणि बहिणीचा नवरा असला मोठा तर काय झालें, म्हणून घरच्या सुनेला दुसऱ्याच्या घरीं इतके दिवस पडून राहणें कसें शोभेल बाई ? आणि तें एक सोडून दिलें तरी जिची सेवाचाकरी करण्यासाठीं यावं लागलं ती बहीणही मरून गेली ! मी म्हणतें—'

मध्येंच तिला अडवून म्हातारा म्हणाला, ' थांब सदू. राहूं देत त्या सगळ्या गोष्टी ! तुझी घरची मालकीण सासू यावेळीं फारच आजारी आहे सूनबाई ! आजचा दिवस चांगला आहे असें पाहून तिनें मला पाठविलें आणि माझ्या सूनबाईला एकवार—'

सदू अर्थात् सौदामिनी दासी पुनः मध्येंच बोलली, 'आणि खरंच बाई, तुझ्या साठींच तिचा जीव आत्तांपर्यंत घोंटाळत राहिला आहे. आज कित्येक दिवस एकसारखी मला सांगत असते कीं, सदू, माझ्या पोरी, यांना एकदां बरोबर घेऊन जा, आणि माझ्या सुनबाईला आणून मला दाखीव. दृष्टीभेट तरी होऊं दे—' बोलतां बोलतां सदूला गहिंवर आला. तिच्यानें पुढें एक शब्दही बोलवेना.

वृद्ध सासरा म्हणाला, 'चाटुय्ये महाशयांना माझीं दोन्हीं पत्रें आजवर मिळालींच नाहींत हें मला आतांपर्यंत माहीत नव्हतें. न कळून मी किती तरी बोललों; पण मनुष्य फारच चांगला ! फार मोठा माणूस !! सत्पुरुषच म्हणायचा !!! माझे ते शब्द ऐकतांच म्हणाला, 'अं' विलक्षणच, अहो तुमची सून तुम्हीं नेणार मग मध्यें अडविणार मी कोण ?' आणि लागलीच मेणा पालखी ठरवून भोयांनाही बोलवायला पाठविलें. तसेंच तुझी सासू आजारी असल्याचें ऐकून अतिशय दुःखित अन्तःकरणानें तो पुनः पुन्हा म्हणाला, 'माझ्या अडचणीच्या वेळीं तुम्हीं आपल्या सुनेला पाठवून माझी गरज भागविली. आतां आपल्या अडचणीच्या वेळीं मी तिला पाठविणार नाहीं हें शक्य तरी आहे का ? जगांत असा दुष्ट मनुष्य कोण असेल बरें ? आत्तां या घटकेला घेऊन जा. जाण्याची मी सगळी व्यवस्था करून देतों. फार सज्जन. फार सज्जन आणि दयाळू !'

ज्ञानदा अजूनपर्यंत अगदीं स्तब्ध उभी होती; पण पाठवणीचे ते शब्द ऐकतांच तिचा चेहरा एकदम निस्तेज झाला. ती उतावीळपणानें म्हणाली, 'चाटुय्ये म्हणाले असं ? आत्तां पाठवितों ? आजच ?'

सौदामिनी खुष होऊन म्हणाली, 'होय. म्हणाले तर ! आणखींही त्यांनीं सांगितलं, जेऊन खाऊन बाहेर पडा म्हणजे तीनची गाडी तुम्हांला सहज मिळेल आणि उद्या सकाळींच तुम्हीं पोंहोंचाल ! हें एक त्याचं म्हणणं झालं पण तूंच पहा, घरांत अत्यावस्थ आजारी माणूस, आतां प्राण जाईल ! घटकेनें प्राण जाईल अशी अवस्था !! मग एक दिवस तरी वेळ लावायला अवकाश आहे का सूनबाई ! अरेरे, म्हातारी केवळ हायहाय म्हणत तुमच्या वाटेकडे डोळे लावून राहिली आहे !'

इतकें सगळें ऐकूनही ज्ञानदा आपली एकाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणें पूर्वी स्वतः उच्चारलेले शब्दच पुनः पुनः उच्चारूं लागली. 'त्यांनीं म्हटलं पाठवितों म्हणून ? आणि आजच ?'

'म्हातारा मान डोलवीत म्हणाला, 'होय मुली, आजच तर काय ? ही काय राहण्याची वेळ ?'

पण ज्ञानदेच्या पुनरुच्चारित शब्दांनीं सौदामिनीला राग आला. आणि तिच्या चढत्या आवाजानें तो व्यक्तही झाला. ती म्हणाली, 'ऐका हिचं बोलणं ! सासू मरायला लागली आहे. ज्याच्या घरची सून ते स्वतः न्यायला आले आहेत. मग पाठविणार कोण आणि विचारायचं काय ? आणि इथं आतां राहायचं तरी काय म्हणून ? तें कशाला, सुनबाई तूं स्वतःच आपल्या मेहुण्याला विचार ना ! नाहीं तर विचारायला पाठीव !!'

पण विचारायला पाठविण्याची पाळी आलीच नाहीं. वाटतें, गोलोक महाशयांची स्वारी जवळच कुठेंतरी पालीच्या कानांनीं हा संवाद ऐकत उभी असावी. सौदामिनीचें बोलणें पुरें होतें न होतें तोंच खडावांचा चट्चट् आवाज करीत राजश्री तेथें येऊनच उभे राहिले. कसल्या तरी घाईत धांदलींत असल्याचा आविर्भाव यावेळीं त्यांनीं आणला होता. म्हाताऱ्याला उद्देशून ते त्याच आविर्भावांत म्हणाले, 'नाहीं. मुखय्ये महाशय, गोष्टी बोलत बसून आतां चालण्यासारखें नाहीं. उशीर होत आहे. स्नानान्हिक संपवून जेवणानंतर थोडी विश्रांती घेतां न घेतां तोंच बाहेर पडलें पाहिजे. या पुढें बाहेर पडायचें म्हणजे वाईट वेळ लागते. आणि म्हणतां काय ? मी कसा पाठविणार ? विलक्षणच. आतां तसं म्हटले तर थोडें दुःख व्हायचेंच. पण तें सांगून काय उपयोग ? सासुबाई आपल्या दुखण्यानें अत्यावस्थ, माझ्या मागें या हजार कामांची धांदल–जंजाळ. एवढासुद्धां वेळ नाहीं. फुरसत नाहीं. सवड असती तर खरेंच मी स्वतः ज्ञानदेला पोंचवून आलों असतों ! पत्र काय मला एक तरी मिळालें म्हणतां ? नाहीं. मिळालें असतें तर तुम्हांला असे यायचे श्रम घ्यावेच लागले नसते. पोस्टमन बेटे काय पाहिजें तें करतील ! काली कुठें गेली इतक्यांतच ? नाहीं तर भूलोला म्हणावं तंबाकू भरून इथेंच एक चिलीम आण !......हं ही घ्या मुखय्ये महाशय. आतां उशीर करूं नका. उठा. ज्ञानदा, जरा घाईनेंच चटपट आटोप ताई ! तीन वाजतांची गाडी धरलीच पाहिजे. छेः तो चोंगदार तिकडे बाहेर बसूनच आहे बेटा ! घरकरीण वारल्यापासून मन अगदीं कसें होऊन गेलें म्हणून सांगू मुखय्ये महाशय ! कसली ती आठवण म्हणून राहतच नाहीं. मधुसूदना ! बाबा तुझाच रे आतां आधार ! तुझाच आधार !!...' असें बोलतां बोलतां ज्या वाटेनें राजश्री आले होते त्याच वाटेनें, सगळें घर खडखडाटानें गाजवीत बाहेर निघून गेले.

ज्ञानदेनें एकाही प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. उलट ते गेले त्या बाजूकडे पहात ती जास्तच ताठरपणानें दगडासारखी जागच्या जागीं उभी राहिली.

भूलो येऊन म्हणाला, 'मावशी, बाळासाहेब आंघोळीसाठीं रडत आहेत. त्यांना नदीवर घेऊन जाऊं ?'

पण ज्ञानदा होती तशीच निश्चल निस्तब्धतेनें उभी राहिली. जणुं काय नोकराचें सांगणें तिला ऐकूंच आलें नसावें.

म्हातारा सासरा हळूहळू उठून उभा राहिला आणि म्हणाला, 'मुली, तर मग मी आतां बाहेर जातों. तूं तयारीनें राहा.'

सौदामिनी म्हणाली, 'माझी आज षष्ठी आहे बाई ! मी जेवणार नसल्याचें घरांत सांग.'

ज्ञानदा अकस्मात् तोंड फिरवून म्हणाली, 'बाबा, मी येणार नाहीं.'

म्हाताऱ्यानें चकित होऊन विचारलें, 'येणार नाहीं ? कां बरं मुली ? आज तर चांगला दिवस आहे !'

सौदामिनी षष्ठीच्या फलाहाराची गोष्ट विसरून लागलीच म्हणाली, 'मी भटजींकडून वेळ नक्षत्र पाहूनच घरांतून बाहेर पडलें आहे बाई !'

ज्ञानदा फक्त इतकेंच बोलली, 'नाहीं बाबा, मला येतां येणार नाहीं.'

तितक्यांत गोलोक महाशयांचा नऊ दहा वर्षांचा मुलगा धांवत येऊन तिला आग्रहानें म्हणाला, 'मावशी, तूं सांग ना. मी नदीवर आंघोळीला जाणारच बघ हं. जाणारच पण—'

ज्ञानदा कुणालाच कांहीं बोलली नाहीं. केवळ त्या वात्य मुलाला हृदयाशीं धरून ओक्साबोक्सी रडूं लागली.

* * *

## ९

त्यानंतर दाराला कडी घालून ज्ञानदा आंत बसली ती कांहीं दारच उघडीना. म्हातारा आंधळा सासरा दुपार टळून गेली तरी एकाद्या असमंजस मनुष्याप्रमाणें बाहेर बसून होता; पण नंतर तो घराबाहेर पडून निघून गेला. सौदामिनीही त्याच्याबरोबर गेली. हें असें करण्यांत ज्ञानदेचा हेतू काय असावा, बोलविण्याला आलेल्या घरच्या माणसांना परतून कां लावावें, हें

तिला कळेना. पण ती बायको माणूस पडली. पुरुषांप्रमाणें न बोलतां मागें फिरणें तिच्यानें होईना. आणि त्यामुळें जातांना त्या बंद असलेल्या दाराबाहेर राहून व ज्ञानदेला उद्देशून ती बरेंचसें कांहीं बोलली. ते तिचे शब्द चांगले नव्हते आणि मधुरही नव्हते. पण ज्ञानदेनें तिच्या कोणत्याच शब्दाला प्रत्युत्तर दिलें नाहीं. इतकेंच नव्हे तर आपल्या रडण्याचा स्वरही तिनें बाहेर येऊं दिला नाहीं.

बालपणींच वैधव्य आल्या दिवसापासून ज्या प्रेमळ सासूनें इतके दिवस पोटाशीं धरून तिला लहानाचें थोर केलें, आपणाला दुःख वाटेल असें एक दिवस जी वागली नाहीं ती आज आसन्नमरण होऊन मरणाच्या दारीं पडली असतां आणि आपल्या दृष्टिभेटीसाठींच केवळ तिचा प्राण तळमळत असतां, स्वतःला बोलवायला आलेल्या वृद्ध, अंध आणि म्हातारपणामुळें जर्जर झालेला सासरा विन्मुख परत जावा, त्याला तसेंच जाणें भाग पडावें, मी येत नाहीं अशी सांगण्याची वेळ यावी, याचेंच दुःख ज्ञानदेला होऊं लागलें. त्या खोलींत तोंड मिटून राहून तें असह्य दुःख ती कसें सहन करीत असेल हें एका जगदीश्वरालाच माहीत ! त्यालाच दिसलें तर तें दिसेल. बाहेर तिच्या त्या वेदनांची कोणालाच कांहीं कल्पना होत नव्हती ! आणि तसें कांहीं चिन्हही दिसत नव्हतें.

म्हातारा विषण्ण चेहऱ्यानें जायला निघाला तेव्हां गोलोक महाशय त्याला भेटले, विनयपूर्वक प्रवास खर्च देण्याचीही इच्छा दर्शविली इतकेंच नव्हे तर ज्ञानदा न गेल्याबद्दल स्वतःला वाटत असलेला विस्मय आणि होणाऱ्या वेदनाही जाणविण्याला कमी केलें नाहीं;पण म्हाताऱ्याचें तिकडे लक्षच नव्हतें !

नंतर गोलोक महाशय बाहेर बैठकीच्या जागीं आले. पहातात तों, मृत्युंजय भट्टाचार्य तेथें बसलेले दिसले. समाजाचे धुरीण गोलोक महाराज आलेले पहातांच भट्टाचार्यांनीं उठून त्यांना नमस्कार केला. गोलोकनीं प्रति नमस्कार करण्याचें सौजन्य न दाखवितां आढ्यतेनें किंचित् मान लववून म्हटलें, ' तुम्हांला मी बोलवायला पाठाविलें होतें बुवाजी ! '

' हो आणि त्यामुळेंच घाईघाईनें कसेबसे दोन घास खाऊन धावतच इकडे आलों ना महाराज. ' मृत्युंजय विनयानें म्हणाले.

गोलोकनीं महत्त्वाच्या विषयाला आरंभ केला. ते म्हणाले, ' हं ते तर आलेले पहातोंच आहें मी ! पण मध्यस्तीचा धंदा करीत गांवोगांव फिरतां

म्हणून विचारतों, पंचक्रोशींतील तशी कांहीं स्थळांची माहिती आहे कीं नाहीं ? खरं सांगायचं म्हणजे, तुमचे आजोबा मध्यस्त या नांवाला शोभणारे होते. रामतारण शिरोमणींना वरवधूंचीं स्थळें आणि समाजाची हालहवाल अगदीं करतलामलवत् असायची ! त्यांत ते सिद्ध हस्त होते.'

मृत्युंजयानीं वारा कोणत्या दिशेनें वहात आहे हें ओळखलें आणि म्हटलें, तें कांहीं खोटें नाहीं पण आतां यांत माझा काय अपराध बरें ? हें काय बायकामाणसांना शोभण्यासारखें काम झालें ? तें एक असो. या जगो भटणीच्या मुलीचा दिमाख तरी केवढा पहा चाटुय्ये महाशय ! रासू आत्याच्या तोंडून ऐकेपर्यंत माझ्या आंगाची कशी नुसती आग होऊन राहिली होती.'

गोलोक महाशयांनीं अत्यंत आश्चर्यचकित होऊन विचारलें, 'काय म्हणतां काय ? काय प्रकार झाला सांगा पाहूं ?'

'आपणाला कांहीं कळलेंच नाहीं ?'

'नाहीं. नाहीं कांहींच नाहीं ! काय झालं ?'

मृत्युंजय भट्टाचार्य सांगूं लागले, 'आपलें घर गृहिणीशून्य झालेलें आणि त्या मुलीच्याही लग्नाचें कुठें जुळेना. होईनाच म्हणाना लग्न ! तशांतच बातमी ऐकली कीं, आपण दया करून त्या ब्राह्मणाचें कुळ रक्षण करण्याची इच्छा केली ! कांहीं लाभ नसतां त्याच्यावर दया करण्याचें ठरविलें. पण ती पोरटी तें ऐकून जोरानें सर्वांच्या तोंडासमोर म्हणाली—छे. ते शब्द उच्चार करणेंच होत नाहीं महाराज ! पण सांगतोंच. म्हणे त्या घाटावर जाणाऱ्या मढ्याच्या गळ्यांत मी आता फाटक्या वहाणाची माळच घालतें. आणि आश्चर्य म्हणजे तिचे आईबापही तिच्या या बोलण्याला साथ देतात !!'

भट्टाचार्यांच्या तोंडचे हे शब्द ऐकून गोलोक महाशयांचा चेहरा रागानें लाल झाला; पण दुसऱ्याच क्षणीं स्वारीनें स्वतःला सांवरलें. चेहरा एकदम बदलला आणि हो हो करून मोठ्यानें हंसत म्हटलें, 'असं म्हणाली नाहीं का ? पोरटी बरीच फाजील दिसते !'

मृत्युंजय रागानेंच बोलले, 'असेल फाजील; पण म्हणून काय तिनें आपल्या सारख्याला असे शब्द बोलावे ? आपल्या पायांवर वरमाला अर्पण करण्याची संधी मिळणें म्हणजे स्वतःच्या छप्पन पिढ्यांचा उद्धार होणार आहे हें तिला कळायला पाहिजे होतें ! म्हणतां काय आपण ?'

गोलोक हास्ययुक्त होऊन प्रशांत चेहऱ्यानें म्हणाले, ' पोरकट आहे! लहान आहे अजून!! मृत्युंजय, बाबा रागवायचं नसतं अशा वेळीं—रागवायचं नसतं. माझी मानमर्यादा केवढी आहे हें तिला काय कळणार? माझी योग्यता जाणणारे तुम्हीं अथवा दहा गांवचे लोक!'

आपला स्वर किंचित् खालावून मृत्युंजयांनीं विचारलें, ' तर मग काय ही वार्ता खरी नव्हे? आपण रासू आत्याच्या मार्फत—'

' राधामाधव! तुम्हीही वेडे झालां काय बुवाजी? अरे ज्याची एवढी थोर लक्ष्मी निघून गेली, तो काय पुनः— बोलतां बोलतां एक दीर्घ सुस्कारा सोडून गोलोक पुनः म्हणाले, ' मधुसूदना, तूंच रे आतां माझा आधार!'

महाशयांच्या भक्तिनें सद्‌गदीत झालेल्या या उद्गारांवर काय बोलावें हें मृत्युंजय भट्टाचार्यांना न सुचल्यामुळें ते केवळ त्यांच्या तोंडाकडे पहातच राहिले.

गोलोक महाशय कांहीं वेळ त्याच स्थितींत स्तब्ध राहून उदासवाण्या स्वरानें म्हणाले, ' राख आणि कोळसे! ध्यानांतही कांहीं रहात नाहीं. लोकांनीं तर रात्रंदिवस मला अगदीं खाऊन टाकलें आहे! याला वांचवा, कसेंही करून त्याचें रक्षण करा, अमक्याच्या कुलाचा उद्धार करा, तमका अगदीं अडला आहे, मुलगी गळयाला लागली आहे...काय करावें? मी कसा आहें हें तर तूं जाणतोसच. नेहमी आपला उदासीन आणि अस्वस्थ! मनाच्या या विसराळूपणामुळें कदाचित् कुणाला कांहीं बोललोंही असेन. वचनही दिलें असेल. मधुसूदना! तूंच एक माझा आधार रे बाबा. धर्ममोक्ष सर्व कांहीं तूंच.'

मृत्युंजय भट्टाचार्य हा अत्यंत कुशल मध्यस्त होता. घटकाचें काम तो पिढ्यान् पिढ्या करीत असे. लग्नें जुळविणें आणि मोडणें हा त्याच्या हातचा मळ! गोलोक महाशयांच्या या भाषणाचा आशय तो तेव्हांच समजला. त्यांतील रहस्य त्यानें जाणलें. आणि विनयानें म्हटलें, ' हां महाराज तसें जर असेल तर आमच्या प्राणकृष्ण मुखय्याच्या मुलीला आपण आपल्या पायांशीं स्थान दिलेंच पाहिजे. ब्राह्मण गरीब आहे. मुलीचें वयही तेरा चौदा वर्षांचें होऊन गेलें! मुलगी कशी गुणांनीं लक्ष्मी आणि रूपानें सुंदर आहे!'

गोलोक बोलले, तूं काय वेडा झाला आहेस मृत्युंजय? मला आतां हें सगळें शोभतें? आवड तरी आहे? आणि काय म्हणतोस, मुलीला

इतक्यांतच चौदा संपलीं? ठीक. चांगली वाढत्या अंगाची मोठी धट्टीकट्टी आहे म्हणून ऐकतों. खरें ना?'

मृत्युंजयाला हें उत्तेजनच मिळालें. तो म्हणाला, 'होय. होय. अगदीं बरोबर. शिवाय स्वभावानें शांत आणि दिसण्यांत सुंदर!'

गोलोक हळूहळू हंसत म्हणाले, 'हं: मला आणि सौंदर्य! काय करायचें आहे बाबा! सौंदर्याची आवड राहिली आहे आतां मला? माझी मूर्तिमंत लक्ष्मी निघून गेली! तिला मी टाळून बसलों. मधुसूदन! मधुसूदन!—पण कुणाचं दुःखही पहावत नाहीं. तसें पाहिलें म्हणजे मनाला वाईट वाटतें. तेरा चौदा तू म्हणतोस तेव्हां पंधरा सोळा सहज असतील! ब्राह्मण मोठ्या संकटांतच पडला आहे म्हणेनास!'

मृत्युंजयानें मान डोलवून होकार देत म्हटलें, त्यांत तर संशयच नाहीं.'

'मृत्युंजय, मी जाणतों सारं! कुलीनाचं कुल संरक्षण करणं हें कुलीनाचंच काम. तसं नाहीं केलं तर पाप आहे. पण एकतर माझं शोक-संतापानं जर्जर झालेलं हें शरीर, वयही पन्नासाजवळ येऊन पोंचलेलं! तरी पण करायचं काय? कोणी विपत्तींत पडलेलं पाहिलं कीं जीव कसा व्याकूळ होतो. मन कळवळतं! जीव शोकाकुल होतो. नाहीं म्हणवतच नाहीं.' गोलोकनीं आपल्या वागणुकीचें समर्थन केलें.

मृत्युंजय पुनः पुन्हा सरड्यासारखी मान डोलवून मान्यता देऊं लागला. गोलोकनीं पुनः एकदां दीर्घ सुस्कारा सोडला व आपलें तेंच बोलणें पुढें चालविलें. ते म्हणाले, 'स्वयंभू कुलीन असलेल्या ब्राह्मणाच्या या पंचक्रोशींत समाजाचा शिरोमणी होणं म्हणजे कोण भयंकर ताप आहे हें माझं मलाच माहीत! अरे, कुणाला अन्न मिळत आहे कीं नाहीं, कुणाला नेसायला वस्त्र आहे कीं नाहीं, गरिबीमुळें कुणाची रोगचिकित्सा होत आहे कीं नाहीं हें सगळें मला पहावें लागतेंच त्यांत माझ्यावर हा असा–लग्नाचाही–जुलूम होऊं लागला तर मी वांचणारच नाहीं मृत्युंजय! प्राणकृष्ण गरीब आहे म्हणतोस! मग मुलगी चांगलीच वाढली असेल! तेरा चौदा काय पंधरासोळा वर्षें तर होऊनच गेलीं असतील! मग प्राणकृष्णाला एकदां दे ना माझ्याकडे पाठवून! म्हणावं, भेटून ये.'

मृत्युंजय कांहीं व्यग्रतेनें म्हणाला, 'आत्तांच गेल्याबरोबर पाठवून देतों. पण मीच त्याला बरोबर घेऊन आलों तर!'

गोलोक उदासीनतेनें म्हणाले, ‘ आण. पण मला मोठ्या संकटांत टाकलेंस बघ मृत्युंजय ! गरीब ब्राह्मणाला या दुःखांतून मुक्त केल्यावांचून तर गत्यंतर नाहीं ! मग नाहीं तरी कसं म्हणूं ? मधुसूदन ! त्वया हृषीकेश हृदिस्थितेन. जें करविशील तें केलें पाहिजे बाबा. मी केवळ निमित्त आहे.—’

मृत्युंजय स्तब्धच होता.

गोलोक महाशयांना तितक्यांतच आणखी कसली तरी आठवण झाली. ते म्हणाले ‘ हं. हें पहा तुला ज्या कामासाठीं बोलवायला पाठविलें त्या कामाचें मी बोललोंच नाहीं अजून ! दिवस मोठे जिकीरीचे आले आहेत. दरमहा जमाखर्चाची तोंडमिळवणी करतांना किती ओढाताण होत आहे म्हणून सांगूं ! तेव्हां तुझे तेवढे व्याजाचे रुपये—’

मृत्युंजय करुणवाणीनें म्हणाला, ‘ हा महिना कृपा करून थोडे थांबलात तर—’

गोलोक म्हणाले, ‘ बरं बरं. थांबतों थांबतों. कुणाला त्रास देऊन एक पैसाही घ्यावा अशी माझी इच्छा नाहीं. पण भटजी बुवा, तुम्हांलाही माझं एक काम केलं पाहिजे. ’

मृत्युंजय आनंदानें म्हणाला, हो. कबूल कबूल आज्ञा करा काय ती !

गोलोक महाशय, समाजांचे अध्वर्यु या आविर्भावानें आतां बोलूं लागले. ते गंभीरतेनें म्हणाले, ‘ सनातन हिंदुधर्मावांचून समाजाच्या रूढि मर्यादा राखणें हें कांहीं कमी जबाबदारीचें काम नाहीं मृत्युंजय ! तेव्हां हा प्रचंड भार ज्याच्या मस्तकावर आहे, त्याला आपले कान आणि डोळे नेहमीं जागृत ठेवावे लागतात. प्रियनाथ मुखय्याच्या आईसंबंधानें कसल्या तरी एका भानगडीचा लोकापवाद होता असें मी ऐकलें आहे. तुला यांत मन घातलें पाहिजे आणि बाबा त्यांच्या मूळगांवीं जाऊन ही काय भानगड आहे याची बित्तंबातमी मिळवून आणली पाहिजे. आणि हें सगळें गुप्तपणें बरं का ! या बाबतींत तुझा आजा शिरोमणी महाशय फार वस्ताद होता. त्याला आसपासच्या दहावीस गांवांतील सगळ्या बारीकसारीक बातम्या अगदीं मुखोद्गत असायच्या. भूपती चाटुय्यावर बहिष्कार घातला आणि दहा वर्षेंपर्यंत जेव्हां त्याचा न्हावी धोबी बंद केला तेव्हां बेट्याला आईचं दूध आठवलं आणि नेस्तनाबूत होऊन गांव सोडून पळून जावं लागलं. पण या कामांत मला ह्यावेळीं शिरोमणीची—तुझ्या आजोबाची—चांगलीच मदत झाली !

पण तुला कांहीं तुझ्या आजोबाची ही कीर्ति राखतां आली नाहीं, असें मला स्पष्ट सांगावें लागत आहे ! '

मृत्युंजय आपल्या पूर्वजांच्या कीर्तीच्या मानानें स्वतः अगदींच हीनपथ ठरल्यामुळें लाजला, आणि म्हणाला, ' आपण आतां पहा तर खरें चाटुय्ये महाशय, एका आठवड्यांतच मी ही गुप्त बातमी त्याच्या पोटांतून काढून आणतों. '

गोलोक उत्साहित होऊन म्हणाले, ' होय होय. तुला तें शक्य आहे. तूं करशीलच बाबा तें काम. त्या मोठ्या वंशांतीलच तूं मुलगा ना ? पण पहा, इतक्यांतच ही गोष्ट पट्कर्णी करावयाची नाहीं. तुझ्या आमच्यात आपली गुप्त ठेव. वेळींच जरूर पडली तर उपयोग करावयाचा. समाजाची मान-मर्यादा राखावयाची असली म्हणजे प्रत्येक काम विचारपूर्वक आणि दूरदर्शीपणानें करावें लागतें. आणि हें पहा, तूं या कामात आपला पराक्रम दाखविलास तर तुझ्या व्याजाचें काय घेऊन बसलास, मुद्दल सोडण्याचाही मी विचार करीन. अरे तूं दुःखी कष्टी माणूस. आपत्ती विपत्ती ही सर्वांवर आहेच. मला हें तूं पूर्वींच सांगितलं पाहिजे होतें. तुला मी तेव्हांच या काळजींतून मुक्त केलं असतें. बरें आतां मात्र—'

या आश्वासनानें मृत्युंजयाचें सर्वांग पुलकित झालें. तो त्या आनंदाच्या भरांत एकदम उठून म्हणाला, ' तें काय सांगायला पाहिजे महाराज ! मी तर आपल्या पायाशीं पडून आहेंच. उद्यांच या गोष्टीच्या तपासाला निघतों–' बोलतां बोलतां तो जायला निघालाही.

तितक्यांत गोलोक महाशय स्वतःची जीभ चावून म्हणाले, भटजीबुवा, असं कधींच बोलायचं नाहीं बरं ! मी निमित्त मात्र आहें. मधुसूदनाच्या पायाशीं कीडमुंगीप्रमाणें पडून राहणारा एक सेवक ! ' असें म्हणून वर पाहिलें आणि हात जोडून नमस्कार केला.

मृत्युंजय जात आहे असें पाहून परमेश्वराच्या नमनांत गढून गेलेले गोलोक अकस्मात म्हणाले, ' आणि हें पहा, प्राणकृष्णाला एकवार माझ्याकडे पाठवून दे. विसरूं नको. ब्राह्मण बिचारा संकटांत आहे हें ऐकून माझं अन्तःकरण तळमळूं लागलं ! नारायण. नारायण. मधुसूदना तूंच रे बाबा माझा वाली !! '

* * *

## १०

प्रसिद्ध जयराम मुखर्ग्ये याच्या मुलीचा मुलगा श्रीमान् वीरचंद्र वंद्योपाध्याय याच्याशीं संध्येचा विवाह निश्चय झाला. दुसऱ्याच दिवशीं वरपक्षाकडची मंडळी मुलीला पाहून आशिर्वादाचा प्रारंभिक कार्यक्रम उरकावयाचा असें ठरलेलें आणि त्याचीच तयारी घरांत चालली होती. मार्गशीर्ष संपतां संपतां विवाह व्हायचा. दिवस अगदींच थोडे राहिलेले ! त्यानंतर अस्त असल्यामुळें पुष्कळ महिने लग्नाचा मुहूर्तच मिळणें अशक्य आणि याच निमित्तानें पुष्कळ वर्षांनीं बऱ्याचशा आग्रहानें काशीहून सासुबाई आलेल्या.

सायंकाळ होऊन काळोख पडण्यास सुरवात झाली होती. स्वयंपाकघराच्या उंबरठ्याजवळ दिव्याच्या प्रकाशात बसून जगद्धात्री फराळाचे गोडधोड करण्यांत मग्न झाली होती. आणि तिच्याजवळच कांहीं अंतरावर कांबळें अंथरून त्यावर, तिची वृद्ध सासू कालीतारा ही हातांत माळ घेऊन जप करीत बसली होती. हवेंत थोडासा गारठा आल्याचें जाणवत असल्यामुळें तिनें आंगावर भगव्या रंगाची दुलई घेतली होती. आणि त्याच रंगाचें वस्त्र ती नेसली होती.

जप करतां करतां सुनेकडे पाहून तिनें शांतपणानें विचारलें. ‘ लग्नाला आतां काय दहा एक दिवस राहिले असतील सुनबाई ? ’

जगद्धात्रीनें मान वर करून सासूकडे पाहिलें आणि म्हटलें, ‘ कुठचे आतां दहा दिवस ? आजचा दिवस धरून नऊच ! एकदां कार्य झालं म्हणजे सुटलें ! जळल्या मेल्या या गांवांत कशाचा भरंवसा नाहीं. योजलेलं कार्य होईल तेव्हांच झालं म्हणायचं ! ! ’

सासू किंचित् हंसून म्हणाली, ‘ सगळीकडे हीच भीति सूनबाई ! केवळ तुझ्याच गांवांत आहे असं नाहीं. आणि सूनबाई इतकी आशा भरंवशाची काळजी कशाला ? असल्या लक्ष्मीसारख्या मुलीला तर तूं पाण्यांतच लोटून द्यायचं ठरविलं आहेस ! ’

जगद्धात्री यावर कांहीं न बोलतां मुकाट्यानें काम करूं लागली. आणि ती उत्तर तरी काय देणार ? ’

सासूच आपण होऊन बोलूं लागली. ती म्हणाली, ‘ प्रियनाथांकडून सर्व

कांहीं ऐकलं आहे. आज सकाळीं स्नान करून येतांना वाटेंत अरुणही दिसला. असला सोन्यासारखा मुलगा तुला आवडला नाहीं ? '

या प्रश्नानें जगद्धात्रीला फारसा आनंद झाला नाहीं. तिनें उत्तर दिलें, ' पण केवळ पसंत असूनच चालतें असं नाहीं. '

' तें नाहीं मी अमान्य करीत, ' सासू म्हणाली. ' पण तिकडून आल्यावर संध्येकडून जेव्हां त्याची सगळी हकीगत ऐकली तेव्हां पोरीच्या मनांतील हेतू कळायला मला वेळ लागला नाहीं. दुःखानें माझं अन्तःकरण कळवळलं. बरं सूनबाई, आई असून तुझ्या नजरेला या गोष्टी कशा आल्या नाहींत म्हणावें ? '

जगद्धात्रीच्या नजरेला पुष्कळ दिवस ही गोष्ट कळून चुकली होती. तिनें सर्व कांहीं जाणलें होतें. पण तें मान्य करणें तिला शक्य नव्हतें. इतकेंच नव्हे तर तिनें एकवार भयभीत होऊन इकडे तिकडे चौकस नजरेनें पाहिलें आणि दबलेल्या स्वरानें सासूला म्हटलें, ' कामाधामासाठीं येणाऱ्याजाणाऱ्याचं घर. कोणी इतक्यांत या बाजूला आलं तर ऐकेल ना ? '

सासू मग कांहींच बोलली नाहीं; पण आपल्या रुक्ष स्वराची जगद्धात्रीलाच लाज वाटल्यामुळें हळूहळू तीच बोलूं लागली. बरं पण आपण तरी असं कसं म्हणायचं होतं ? तुमचं कुळशील केवढं थोर ! त्या कुळाला काळिमा लावून मी लोकांत तोंड तरी कसं दाखवूं सांगा ना ? शिवाय त्यानं आपली जातही गमावली ! जिनं त्याची बाजू घेऊन तुमच्याशीं इतकी वकिली केली, ती काय ही गोष्ट बोलली नाहीं ? '

जगद्धात्रीला वाटलें, या आपल्या प्रश्नावर कुणालाच कांहीं उत्तर देतां येणार नाहीं. पण तिच्या सासूनें तिच्यापेक्षां चार पावसाळे जास्त पाहिले होते. ती मान वळवून म्हणाली, ' बोलली तर काय झालं ! पण त्यानं जात गमावली हेंच मुळीं खरं नाहीं. त्याचं सगळं कांहीं गेलं नाहीं आणि त्यानं गमावलंही नाहीं. त्याचं सगळं कांहीं आहे. केवळ तो जास्त शिकला, अक्कलहुषारीनें थोर आहे म्हणून नाहीं म्हणत मी ! कमी जातीच्या म्हणून ज्या अनाथ मायलेंकराला तुम्हीं घालवून दिलं त्यांना त्यानं आपलेपणानं जवळ घेतलं ! त्याची जात देवाघरीं अमर झाली. सूनबाई, त्याची जात कोणाही मनुष्याला नाहींशी करतां येणार नाहीं. '

जगद्धात्री मनांतल्या मनांत क्रुद्ध होऊन म्हणाली, ' अनाथ म्हणून काय

हाडीडूल्यांना ब्राम्हणाच्या घरांत जागा देतां येईल ? अस्पृश्यांना कोण जवळ करील ? शास्त्रांत तसं सांगितलं आहे ? '

सासूनें उत्तर दिलें, ' शास्त्रांत काय सांगितलं आहे, शास्त्र काय म्हणतें, तें कांहीं मला माहीत नाहीं सूनबाई ! पण स्वतःच्या वेदना, अन्तःकरणाचा कळवळा किती तीव्र असतो हें मला चांगलं माहीत आहे. मी कांहीं कुणाला शिकवावं सागावं म्हणून बोलत नाहीं पण सूनबाई, या वेदना जर तुला जाणत्या असत्या किंवा सहन करण्याची पाळी आली असती तर, हलकी जात म्हणून मनुष्याला शासन करणाऱ्याला ईश्वराकडून नेहेमी कोणती कोणती शिक्षा होत असते हें तुला चांगलं कळलं असतं. कुळाची मर्यादा आणि कुळशीलाचा अभिमान या जाळ्यांत गुंतल्यानं मनुष्याच्या हातून केवढं भयंकर पाप होतं, त्याची केवढी फसवणूक होते, अहर्निश कसल्या अवजड दडपणाखालीं दबून त्याला आपले सगळे कोमल मनोविकार जाळावे लागतात हें जर तुला जाणतां आलं असतं तर आपल्या एकुलत्या एका लाडक्या मुलीचा तूं असा बळी दिला नसतास. जात आणि कुळ हेंच काय तें खरें आणि दोन जिवंत माणसाचं सगळ्या आयुष्याचं सुखदुःख काय अगदींच खोटं ? शास्त्र काय असला निर्दयपणा करायला सागतं ? आणि सांगितलं असेल तर तें कोणा सहृदय माणसानं लिहिलं आहे असं तूं मानशील ? '

जगद्धात्री क्षुब्ध अन्तःकरणानें म्हणाली, ' तर काय या असल्या मिथ्या भावनेनं पृथ्वी चालली आहे ? '

सासूच्या चेहऱ्यावर खिन्न हास्याची छटा उमटून गेली. तिनें उत्तर दिलें, ' पृथ्वी चालत नाहीं सूनबाई, चालतो केवळ आमच्या शापित जातीचा दांभिकपणा ! मी दूरच्या देशांत राहातें, वयही बरेंच झालेलं आहे, पाहिलं आहे ही पुष्कळ, दुःखही पुष्कळ सहन केलं. समाजांत ज्याला वंशमर्यादा म्हणून मानतात, कुळशीलाचा श्रेष्ठपणा मिरवतात, तें यथार्थ काय आहे हें मी जाणतें. पण यापेक्षां हें उघड करून मी तुला सांगूं शकत नाही आणि तुला तें कळणार नाहीं. तरी पण माझी ही गोष्ट तूं ध्यानांत ठेव मुली, मिथ्या आणि भ्रामक समजुतीना मर्यादेचें कुंपण घालून जितक्या उंचीवर तूं त्यांना नेऊन ठेवशील तितक्या उंचीवरही त्यांत ग्लानी, बीभत्सता, आणि अनाचार यांचे ढीग सांचलेले तुला दिसतील ! आजही दिसत आहेत; पण तूं पहात नाहींस. तुला डोळे नाहींत ! '

यावरही जगद्धात्री कांहीं तरी उत्तर देणार होती; पण तितक्यांत तिथें येत असलेली संध्या तिला दिसल्यामुळें ती स्तब्ध राहिली.

* * *

## ११

संध्या अजूनपर्यंत बागेंतील आपल्या फुलझाडांना पाणी घालीत होती. दरवाजांतून आंत येतांच तिनें हातांतील कळशी आंगणांतील चौकावर ठेविली आणि सासू सुनेचें हितगुज चाललें होतें त्या ठिकाणीं ती येऊन उभी राहिली. नंतर आईकडे पाहून म्हणाली, ' हें काय आई, चंद्रपुली वाटतें ? ' इतकेंच म्हणून तिनें चटकन आजीकडे पाहून तिला विचारलें, ' होय ग आजी, सर्वांकडे लाडू असतात; मग आमच्याचकडे कां नाहीं ग ?

कालीतारा नातीच्या प्रश्नावर प्रेमळपणानें हंसून म्हणाली, ' तें मला तरी कुठं माहीत आहे आक्काताई ! '

संध्येनें विचारलें, ' वा: तूं आपल्या सासूला विचारलंस नाहीं वाटतं ? '

कालीतारा म्हणाली, ' विचारायचं तरी कसं बाई ! जन्मांत कधीं सासूच्या घराचं तोंडही पहाण्याचा प्रसंग आला नाहीं ! '

जगद्धात्रीला हें माहीत होतें. पण माहीत असलेल्याही कित्येक गोष्टी उच्चारलेल्या ऐकवत नाहींत. जगद्धात्रीला लाज वाटली. आणि खालीं मान घालून ती आपलें काम करूं लागली.

संध्येनें पुन: आपल्या आजीला प्रश्न केला, ' बरं, आजी, तुझ्या सगळ्या मिळून किती सवती होत्या ग ? शंभर, दोनशें, तीनशें चारशें ? किती ? '

आजी पुन: हंसून म्हणाली, ' मला नकळे बाई; पण नसतील असें नाहीं. माझं लग्न झालं होतं वयाच्या आठवे वर्षी आणि त्या वेळींच त्यांच्या शांयशीं बायका होत्या म्हणे. शांयशीं कुटुंबांशीं त्यांचा संबंध आला होता. आणि त्यानंतरही त्यांनीं अनेक लग्नें केलीं होतीं. पण त्यांची संख्या किती हें खुद्द तेच जाणत नव्हते ! मग मला ग कुटून कळणार ? '

संध्या म्हणाली, ' पण त्यांचं लिहिलेलं तर असेल ना ? ती तेवढी चोपडी जर तूं जपून ठेवली असतीस आजी, तर बाबांकडून त्या सर्वांचा शोध करविला असता. म्हणजे मग आपल्या परिवारांतील ही सर्व मंडळी कोण कुठें आहे तें मला कळलं असतं. कदाचित् माझे काका किती तरी असतील

चुलत्यांची तर संख्याच प्रचंड असणार ? काकी काकी म्हणतां म्हणतांच जीव बेजार व्हायचा ! आणि भावा बहिणीची तर संख्याच मला मोजतां आली नसती. नाहीं ग आजी ! आहा हा ! ही सर्व मंडळी कुठंकुठं आहे हें जर मला कळेल तर काय मौज होईल'

नंतर किंचित् हंसून तिनें विचारलें, 'बरं आजी, आजोबा कधींकाळीं तुझ्या घरीं आले तर त्यांना किती रुपये द्यावे लागत असत ग ? दर दाम ठरवितांना त्यांचं तुझं मोठं भांडण होत असेल नाहीं ?'

मुलीच्या या तसल्या बडबडीचा जगद्धात्रीला पराकाष्ठेचा राग आला. ती म्हणाली, 'लहानतोंडीं मोठा घांस घेणं बरं नव्हे संध्या ! देवघरांत जाऊन धुपारतीची तयारी कर जा पाहूं.

आजी स्वतःशींच किंचित् हंसत म्हणाली, 'ताई, सर्व कांहीं मला ठाऊक आहे; पण तुमच्या मोहामुळं कांहीं बोलवत नाहीं.'

नातीचें आणि आजीचें गतायुष्यासंबंधानें चाललेलें हें समालोचन जगद्धात्रीला मुळींच पसंत पडत नव्हतें. मनातल्या मनांत रागानें ती नुसती जळफळत होती. सासूचें तें अखेरचें वाक्य ऐकून ती म्हणाली, 'तेव्हांच्या काळीं काय काय चालीरीती होत्या माहीत नाहीं पण आजकाल अशीं कुणाचीं अनेक लग्नेंही होत नाहींत आणि कोणी करीतही नाहीं. तसल्या त्या अत्याचार अनाचारांचा काळ आतां राहिला नाहीं. आणि कांहीं लोकांकडून एके काळीं जर तसा कांहीं अन्याय घडला तर काय वंशाची मानमर्यादा सोडून द्यायची ? मी जिवंत असेपर्यन्त तरी निदान तसें होऊं देणार नाहीं.'

आजकाल सून झाली तरी घरजांवई या नात्यानें तीच घराची मालकीण होती. तेव्हां तिच्या या उत्तरावर सासू काय बोलणार ? ती बिचारी स्तब्धच राहिली. तिच्या श्रेष्ठ वंशाची मानमर्यादा कमी करण्याचा हक्क सासूला कसा मिळणार ? पण संध्येला स्वस्थ राहवेना. तिच्या मनाला ती गोष्ट बरीच लागली. ती आजीच्या जवळ तिच्या आंगाला अंग लावून बसून कोमल स्वरानें म्हणाली, 'पण आजी, त्यांच्या हातून हा असा अत्याचार कां घडत असे ग ? माया ममता काय मुळींच नव्हती त्यांना ?'

आजीनें संध्येच्या हाताला धरून तिला जवळ ओढून घेतली आणि म्हटलें 'माया ममता कशी असणार ताई ? अग एका रात्रीखेरीज सगळ्या आयुष्यात ज्यांची आणखीं कधीं गांठच पडणार नाहीं त्यांच्यासाठीं माया

कसली आणि ममता कसली? दुःख तरी कसं व्हायचं! जीव तरी कसा तळमळायचा! आणि तुझ्यावर जो आज अत्याचार होत आहे तो काय त्या वेळच्या अत्याचारापेक्षां एक रेंसभर तरी कमी आहे असं वाटतं तुला?'

जगद्धात्रीच्या अन्तःकरणाला हा प्रश्न चांगलाच जाणवला. हातांतील काम तसेंच टाकून ती एकदम उठली आणि अत्यंत कठोर स्वरानें मुलीला उद्देशून म्हणाली, 'तूं देवघरांत जाणार कीं मी हातचें काम ठेवून जाऊं?'

संध्येनें आईच्या तोंडाकडे पाहिलें; पण कांहीं बोलली नाहीं आणि उठलीही नाहीं. इतकेंच नव्हे तर उठण्याचा नुसता आविर्भावही आणला नाहीं तिनें. उलट हळूहळू ती आजीशींच बोलूं लागली. तिनें विचारिलें, 'पण ज्याचा इतका सन्मान ठेवायचा, ज्या वास्तवतेला मानून चालायचें त्या इतके दिवस परंपरेनें चालत आलेल्या रूढीला एकदम नाहींशी करून टाकणें तरी चांगलें का आजी?'

यावेळीं सासूनेंही सुनेच्या रुक्ष आणि कठोर स्वराकडे लक्ष द्यावयाचें नाहीं असें ठरविलें असावें. कारण नातीचा तो प्रश्न ऐकून तिनें तिला धीर गंभीरतेनें जबाब दिला, 'अग, कोणती एकादी गोष्ट बरेच दिवस चालत आलेली आहे म्हणून काय ती चांगली ठरते ताई! अग तिला लोक मान देत असले तरी वाईट ती वाईटच. मधुन मधुन विचार विनिमय करून, संशोधन करून त्यांत सुधारणा अवश्य केली पाहिजे. मायामोहामुळें जे डोळेझांक करतात त्यांचा नाश होतो. माझी सगळीच कर्मकहाणी कुणाला मला सांगायची नाहीं, सांगतां येत नाहीं म्हणून, नाहींतर तूं चकित झाली असतीस. आणि या दमछाटीनेंच माझें सगळें आयुष्य विवाहाच्या ज्वाळानीं जाळून पोळून जात आहे. मला त्या यातना सहन कराव्या लागत आहेत—' बोलतां बोलतां म्हातारीचा कंठस्वर अंतरींच्या असह्य वेदनांनीं गुदमरून गेला. तिच्या तोंडून शब्दच उमटेना.

संध्येनें तिचा हात आपल्या हातांत घेऊन धीर स्वरानें म्हटलें, 'आजी, जाऊं देत त्या गोष्टी!'

आजीनें दुसऱ्या हातानें आपल्या नातीला पोटाशीं धरलें आणि कांहीं वेळ स्तब्ध राहून मनाला आवर घातल्यावर सहज स्वरानें ती म्हणाली, 'संध्या, देशींच्या राजानें एके काळीं गुणकर्मांच्या पावित्र्याची एकतानता असावी, गुणांची समष्टी व्हावी म्हणून ब्राह्मणाला कुलीनतेच्या मर्यादेंत, कौलिन्यांत

जातिबद्ध केलें होतें. नंतर असाही एक वाईट काळ आला, त्या दिवशीं याच देशींच्या राजानें, ब्राम्हणांच्या कौलिन्य प्रथेंतील वाढत्या दोषांची गणना करून आपल्या हुकमानें त्यांचीही संघटना केली. अर्थात् अनेक दोष आणि तीव्र अत्याचार यांच्या विकृत पायावर या उच्च जातीची उभारणी झाल्यामुळें, राजाला अन्तःस्थितीची कल्पना होऊं न दिल्यामुळें आजच्या या विपरीत अवस्थेला ती जात येऊन पोंचली आहे. या रूढींतील आणि आचारांतील खोटेपणा, दांभिकपणा जर कळला असता तर ज्या कुलीनतेच्या अभिमानानें मुग्ध होऊन तूं स्वतःच्या खऱ्या हिताला पारखी होत आहेस ती कुलीनता आंतून किती बीभत्स झाली आहे हें पाहून तूं खालीं मान घातली असतीस. इतकेंच नव्हे तर, हलकी जात म्हणून दूले जातीच्या ज्या माय-लेकीला तुम्हीं घालवून दिलें त्यांना हलक्या जातीचीं म्हणायला तुम्हांला लाज वाटली असती. दिवसा वर मान करून चालतांना तुम्हांला लाज वाटली असती!'

जगद्धात्री क्रोधानें आणि तिरस्कारानें हिरवी पिंवळी होऊन तिथून उठून गेली; पण संध्या उठली नाहीं. तशीच आजीजवळ बसून राहिली.

आपली वैराग्यशील सत्यवादिनी आजी मनांतल्या मनांत कसल्या तरी एका लज्जास्पद गत इतिहासाचा चित्रपट पाहून अहर्निश वेदना अनुभवीत असावी. तो इतिहास सांगण्याचें तिला धैर्य होत नसावें अशी संध्येची पक्की समजूत झाली. आजीचें तळमळणारें अन्तःकरण पाहून व तिला होत असलेल्या वेदनांचें कठोरत्व जाणून संध्येला वाटलें, आपल्या आजोबांच्या बहुपत्निक-त्वाशीं तर या लज्जास्पद इतिहासाचा संबंध जडलेला नसेल ना! असेलही. नाहीं तर आजी बोलल्यावांचून राहती ना.

बराच वेळ स्तब्ध राहिल्यावर संध्येनें आपण होऊनच संकोचित स्वरानें विचारलें, 'आजी, आमच्या ब्राह्मण जातींत खरोखरच अनेक अनर्वचनीय अनाचारांनी पदार्पण केलं आहे का? ज्या जातीच्या कुळशीलाचा आम्हीं इतका अभिमान बाळगतों, तो काय सगळा व्यर्थच!'

आजीनें उत्तर दिलें, 'तो किती आणि कसा व्यर्थ आहे, हें माझ्या इतकें कोणीच जाणत नसेल.' पण हे शब्द उच्चारायलाही त्या माउलीला किती कठीण गेलें, डोळ्यांत कसें टचटचून पाणी आलें आणि चेहरा किती विकृत झाला हें सायंकालीन अंधारांतही संध्येच्या नजरेला आल्यावांचून

राहिलें नाहीं. आजीनें स्वतःच्याच हातानें स्वताचे डोळे पुसून म्हटलें, ' पण आतां मधुन मधुन माझ्या मनांत काय येतें माहीत आहे संध्या ? माणसां-माणसांत होत चाललेलें हें अन्तर मनुष्यच स्वतःच्या हातानें घडवीत आहे. देवाचा असा नियम नाहीं आणि त्यानें यांत हस्तक्षेपही केलेला नाहीं. मनुष्याचाराचे कोणतेही नियम देवानें घालून दिलेले नाहींत. मनुष्याच्या आंतरिक मीलनाच्या मार्गांत नव्हे, तर मोकळ्या असलेल्या मुख्य दरवाजांत मनुष्य आपल्या हातानें इतके कांहीं कांट्यावर कांटे पसरीत आहे तितके कोणी शत्रूही पसरणार नाहीं. आणि याचमुळें हें अत्याचारांचें कुंपण—समाजमर्यादा म्हणतात याला—अनाचारांच्या शेंकडों छिद्रांनीं डळमळूं लागलें आहे. इतकेंच नव्हे तर या छिद्रांतून पापाचा आणि नष्टतेचा लपून छपून आंत प्रवेश होत आहे !! '

यावर संध्या काय बोलणार आणि बोलायचें तरी काय कळणार ! अर्थात दोघीही बराच वेळपर्यन्त स्तब्ध बसून राहिल्या. मात्र ' या सगळ्या विवेचनाशीं आपल्या आजोबांच्या बहुविवाहाचा खरोखरच कांहीं तरी नीच संबंध असावा. ' असें पुनः पुनः संध्येला वाटूं लागलें. आणि ' काय असेल नकळे ' असें मनांत येऊन ती भिऊन गेली.

आजीनें नंतर म्हटलें, ' जा बाळ, देवघरांतील काम आटोपून टाक आतां, नाहींतर तुझी आई रागावेल बघ.'

संध्या या वेळीं भानावरच नव्हती. आणि त्याच मनस्थितींत तिनें उत्तर दिलें, ' ती स्वतःच सगळें करील आतां. ' नंतर आजीचा हात आपल्या हातांत घेऊन ती म्हणाली, चल आजी. माझ्या खोलींत बसून आम्ही त्या जुन्या काळांतील गोष्टी बोलूं.'

आणि असें म्हणून आपल्या आजीला तिनें एक प्रकारें आग्रहानें ओढीतच आपल्या निजण्याबसण्याच्या खोलींत नेलें.

* * *

## १२

रात्र कांहीं फारशी झाली नव्हती. एक प्रहर झाली असावी. पण दिवस थंडीचे. त्यांत खेडेगांवची वस्ती. त्यामुळें इतक्यांतच मध्यरात्र झाली कीं काय असा भास होत होता.

ज्ञानदा झोंपत असे त्या खोलींत मातीच्या पणतींत तेवत असलेली वात मिणमिण जळत होती. ज्ञानदा आणि तिच्यापासून थोड्याच अंतरावर रासमणी अशा दोघी जमिनीवरच बसल्या होत्या. रासमणी हातवारे करून आणि ओठांची विलक्षण हालचाल करून ज्ञानदेला समजावून सांगत होती ' माझं ऐक ज्ञानदा. नसता वेडेपणा करूं नको. औषध आणून दिलें आहे तें पिऊन टाक. तूं एवढें औषध घेतलेंस कीं पुन: जशीच्या तशी होशील. कोणाला कांहीं कळणारही नाहीं. '

ज्ञानदा येणारे अश्रू आवरून गहिंवरलेल्या स्वरानें म्हणाली, अशी गोष्ट मला तुम्हीं सांगतां तरी कशी ? एक पाप झाकण्यासाठीं आणखीं हें दुसरें पाप करून बसूं म्हणतां ? नरकांतही मला जागा मिळणार नाहीं आक्का ! '

रासमणी तिरस्काराच्या स्वरानें तिला धमकावून म्हणाली, ' आणि एवढ्या मोठ्या कुळाला काळिमा लावून स्वर्गाला जाण्याचा विचार आहे वाटतं तुझा ? पचेल रुचेल तेंच करावें ज्ञानदा ! असा अक्रासाळपणा करून एवढ्या मोठ्या देशपूज्य मनुष्याला तूं खालीं मान घालायला लावूं नको ? '

ज्ञानदा हात जोडून रडत रडत म्हणाली, ' हें औषध कांहीं केल्या माझ्यानें घेववणार नाहीं. मला वीष देऊन तुम्हीं मारून टाकणार आहां हें मी चांगलें जाणलें आहे. '

आधींच विकृत असलेला आपला चेहरा जास्तच विकृत करून रासमणी बोलली, ' हां. असं सांग तर मग ! मरणाच्या भीतीनें हें औषध तूं घेत नाहींस, होय ना ? मग उगाच धर्माच्या नांवानें कशाला ओरडतेस ? पापपुण्याचा उच्चार कशाला करतेस ? '

' पण हें वीष आहे आक्का ! ' ज्ञानदा निर्वाणीनें म्हणाली.

' वीष असलं तर तुझं काय गेलं ? तूं तर यानें मरत नाहींस ना ? ' असें म्हणून लागलीच स्वत:च्या स्वरांतील तीक्ष्णता एकदम कमी करून कोमल व करुण स्वरानें रासमणी समजाऊं लागली, ' वेडी नाहीं तर ! उगाच वेड्या-सारखं करूं नये. अग, आम्हीं काय तुला अपायकारक जिन्नस खायला देऊं ? असं कधीं झालं आहे ? रासी भटणीला असं कोणी तरी कधीं म्हणेल ? तेव्हां मी म्हणतें ताई, दुर्दैवानें जो शत्रू तुझ्या पोटाचा आश्रय घेऊन बसला आहे, जो पुढें जन्माला येऊन संकटात घालणार आहे त्याचा एकदां निकाल लागूं दे ना. तो नाहींसा झाला कीं पिडा टळली ! आणि हें

सगळें किती अगदीं थोड्या वेळांत होऊन जाईल. पुन: आपली पूर्वी होतीस तशी तूं कायम. खा पी फीर चैन कर. तीर्थ धर्म, व्रतवैकल्य काय पाहिजे तें करायला मोकळीक. लोकांत सतीसाध्वीचा मान. थोरांचा आश्रय. तुझें हें असें झालें आणि तूं असें केलें याचा उच्चार तरी कोण करणार? आणि केला तरी तो ऐकणार कोण?'

ज्ञानदा अधोमुख होऊन जशी बसली होती तशीच स्थिर बसून राहिली. तिनें कांहींच हालचाल केली नाहीं.

रासमणीनें विचारलें, 'ताई, तर मग औषध आणायला सांगूं का?'

ज्ञानदेनें वर न पहातांच रडत रडत म्हटलें, 'नाहीं. मी कांहीं केल्यानें घेणार नाहीं. आणि तसं झालं तर कांहीं केल्या मी वांचणारही नाहीं.'

या तिच्या उत्तरानें रासमणीचा राग अनावर झाला. ती क्रुद्ध स्वरानें म्हणाली, 'ज्ञानदा! औषध नाहीं घ्यायचं तुला? जा चालती हो इथून. ते किती झाले तरी पुरुष. करूं नये तें काम त्यांनीं एकवार केलें. बेभान स्थितींत घडून गेली गोष्ट. म्हणून काय तूं बायको माणूस असून असें हट्टून बसावें? बायकांच्या जातीला हें शोभत नाहीं. चाटुर्य्येदादांनी सांगूनही टाकलं आहे, ते म्हणाले, 'बरं. जें व्हायचं तें होऊन गेलं. तिला मी पन्नास रुपये देतों. काशी वृंदावनाकडे कुठेंही ती निघून जाऊं दे.' इतकें त्यांनीं आपण होऊन सांगितल्यावर त्यांना कसा दोष द्यावा बरं ज्ञानदा? आणि रुपये तरी काय थोडे थोडके आहेत? चांगले भरगच्च मूठभर!'

ज्ञानदेनें उत्तर दिलें, 'मला रुपयांची गरज नाहीं आक्का. रुपये घेऊन मी काय करूं? माझी कुठं ओळख ना देख. कुणाकडे कशी म्हणून हें काळं तोंड घेऊन जाऊं?'

रासमणी बोलली, 'एकाद्याला पेंचांत अडकविण्याची भाषा दिसते ही तुझी ज्ञानदा! लोक बोलतां बोलतां काशीवृंदावनाचं नांव घेतात! इतक्या अफाट लोकाना तिथं जागा मिळते आणि तुलाच तेवढी मिळणार नाहीं होय!'

ज्ञानदा कांहीं वेळ स्तब्ध राहून नंतर म्हणाली, 'रासूआक्का, मला सगळं कळतं बरं. उद्यां ते प्राणकृष्ण मुखर्य्येच्या मुलीबरोबर विवाह करणार आहेत हेंही मी जाणतें. आणि यासाठींच आज मला वीष देऊन अथवा काशीकडे रवाना करून कोणत्या तरी उपायानं दूर करण्याचं ठरविलं आहे त्यांनीं!! पण देवा नारायणा—' बोलतां बोलतां ती ओक्साबोक्शीं रडूं लागली आणि

दोन्हीं हात जोडून पुढें म्हणाली, ‘ देवा, तुझ्या पायांशीं इतक्या लोकांना तूं जागा देतोस मग मलाच कां नाहीं मिळणार? पण लहानपणापासून केव्हां कोणतेंही पाप केलें नाहीं, कदाचित् कधीं तें माझ्या हातून घडलेंही नसतें–काय सांगूं! तूं सर्व जाणतोस केवळ निरुपाय—आम्हीं गरीब गाई—म्हणून या पापाचें खापर माझ्या एकटीच्या डोक्यावर फुटावें आणि मी तें एकटीनेंच सहन करावें?’

देवाचें नांव ऐकल्यानें पिशाचाला संताप येतो म्हणतात म्हणून कीं काय नकळे, पण ज्ञानदेच्या तोंडचे ते ‘ देवा नारायणा ’ हे शब्द ऐकून रासमणीच्या सर्वांगाची लाहीलाही झाली. ती तिला धमकावून म्हणाली, ‘ मर शिंचे–शापतेस ग कुणाला? तूं काय अगदीं नकळती मुलगी आहेस वाटतं? चोराच्या उलट्या बोंबा म्हणतात त्या ह्या अशा! तूं जवळ केलं नसतंस तर काय मजाल आहे पुरुषांनं आंगाला हात लावण्याची? त्या थोर माणसाला कशाला दोष लावतेस? रासू भटणीच्या वाटेला जाणारा कोण बेटा आहे सांग पाहूं? तूंच तसली आणि लोकांना बोल लावतेस!’

हे निरुत्तर करणारे प्रश्न होते. बिचारी ज्ञानदा या प्रश्नांचीं उत्तरें काय देणार? ती मुकाट्यानें डोळे पुशीत राहिली. नंतर रासमणी आपण होऊन कल्पनेपलीकडे आपला स्वर खालावून म्हणाली, ‘ बरं ज्ञानदा, कोणा बाई माणसाकडचं औषध घ्यायला जर तुला भीति वाटते तर पुरुषाचं घे. घेशील का? प्रियनाथ मुखय्यावर तरी तुझा विश्वास आहे? तो कदाचित् एकादें औषध देईल. आणि त्या औषधानं तुझं हें—’

थक्क होऊन ज्ञानदेनें विचारलें, ‘ ते देतील?’

रासमणीनें उत्तर दिलें, ‘ अंः न देऊन कुणाला सांगतो! अग, चाटुय्ये दादानं नुसतं सांगण्याचा अवकाश कीं मिळेल त्या रस्त्यानें धावत येईल. आणि त्याला कळविलंही आहे. आला म्हणजे झालं. मग मात्र नाहीं होय म्हणून चालायचं नाहीं हं सांगून ठेवतें.’

ज्ञानदा गप्पच राहिली. अर्थात रासमणीचा उत्साह जास्त वाढला. ती त्या उत्साहाच्या भरांत आणखी कांहीं बोलणार होती; पण तितक्यांत जवळच्या आंगणांत व्हाणाचा आवाज झाला. आणि त्याबरोबरच प्रियनाथ मुखय्याचा शब्द ऐकूं आला.

* * *

## १३

' छेः इथें एक दिवासुद्धां लावूं नये ? अरे, ही सगळी मंडळी गेली तरी कुठें ? —' असें बोलत बोलत प्रियनाथ बाबू आंत येऊन थडकले. बगलेंत दाबून धरलेलीं लहान मोठीं चारपांच पुस्तकें तक्तपोशीवर व हातांतील पेटी खालीं जमिनीवर ठेवीत ते पुढें म्हणाले, आज कशी काय तब्येत आहे ज्ञानदा ? अहंः छेः तें चालायचें नाहीं. नाहींच चालायचें. हवा फार थंड पडली आहे. जमिनीवर बसून चालणार नाहीं. रेमिडींत थोडासा बदल करावा लागेल असें वाटतें. आं ? ही तर मावशीही इथें बसलेली आहे ! किती वेळ झाला येऊन ? सगळी मंडळी खुशाल आहे ना ? तुझ्या नातीला मी काल रस्त्यांत पाहिली होती. तिची तब्येत कांहीं चांगली आहे असं मला वाटलं नाहीं. भूक कशी काय लागते ? उद्यां एकवार तिकडे जाऊन तिची जीभ पाहिली पाहिजे. छेः मरायलाही फुरसत नाहीं. कुणीकुणीकडे म्हणून जावं ? बरं इकडे लक्ष न ठेवावं तर उद्या मुलीचं लग्न–पण मावशी उद्यां सकाळींच तुला तिकडे आलं पाहिजे बरं. मुलीचं लग्न. तेव्हां उद्यां कांहीं मला बाहेर कुठं जातां येणार नाहीं. आणि त्यामुळं रोग्यांची अवस्था काय होईल याचा विचार करतों आहें मी ! एक दोन नव्हेत ! अलीकडे असं आहे, प्रिय मुखर्ज्याला सोडून विपिनला बोलावण्याची कुणाला इच्छाच होत नाहीं. त्याचं तरी कसं चालायचं ? वाईट वाटतं मोठं. कसा झाला तरी तो थोडासा शिकलेला आहेच ना ? हं बघूं हात दाखीव पाहूं. ऐकलं कीं पंचू गवळ्याला सर्दी झाली आहे. त्याला एकदां चटकन पाहून यायलाच पाहिजे. हं. एकवार हात दाखीव पाहूं—'

ज्ञानदेनें कांहीं हात पुढें केला नाहीं. ती मुकाट्यानें अधोमुख होऊन जशी बसली होती तशीच बसून राहिली.

पण रासमणी कशी स्वस्थ बसणार ? ती म्हणाली, ' या पोरटीचा हा काय प्रकार ठरविला आहे तुम्हीं जांवईबुवा ? '

प्रियनाथ तिच्या तोंडाकडे पाहून म्हणाले, ' डिस्–अजीर्ण अपचन, आम्लपित्त, आम्ल—'

प्रियनाथ बोलतां बोलता मध्येंच थांबले. कारण प्रश्न विचारणारीनें त्यांच्या प्रत्येक शब्दाला नकारात्मक मान हालविण्याला सुरवात केली होती. आणि

तो संकेत पाहून प्रियबाबूंच्या डॉक्टरी विद्येचा अस्त होण्याची वेळ आली होती. त्यांनीं व्यग्रतेनें विचारलें, कां, नाहीं का म्हणतां ? विपिन आला होता वाटतें ? काय म्हणाला तो ? तो काय औषध देऊन गेला पाहूं ? कुठें आहे ?'

रासमणीला खरें खोटें,–कठोर–मृदु, बरें–वाईट कांहींही बोलण्याला हरकत वाटत नसे. तिच्या तोंडाला ती संवयच झाली होती. कारणाकारणाचा वेळप्रसंगाचा कसलाही विचार करण्याचें तिला बहुधा माहीतच नव्हतें. असा तिचा नित्याचा रिवाज असला तरीही आज तिला अतिशय सावधगिरी बाळगणें अवश्य झालें. ती मान हालवीत म्हणाली, नाहीं बाबा. विपिन डॉक्टरला कुणी बोलविलें नाहीं आणि पराण चाटुय्येही आला नाहीं. तुमच्या पुढें त्या दोघांची काय किंमत ? चाटुय्येदादा तर सर्वांकडे तुमचीच प्रशंसा करीत फिरतो !'

'तो कां नाहीं करणार ? सगळेच करतात. आणखी दहा वर्षेपर्यंत विपिनला मी शिकवीन ! त्या दिवशीं पल्सेटिला देऊन—'

मावशी मध्येंच म्हणाली, 'शिवाय ही पोरटी तर इतकी हटवादी, दुसऱ्या कुणाला बोलवूंच देईना.'

प्रियबाबू उतावीळपणानें कांहींसे गरम होऊन म्हणाले, मी असतां दुसरा येईल इथं डाक्टरी करायला ? पण काय समजलीस मावशी, हा रोग बरा व्हायला थोडा अवधी लागेल. आणि दुसरेंही सांगतों, दोहोंपेक्षां तिसरी एकही रेमिडी मी देणार नाहीं. काय ज्ञानदा, सर्वांगाची होणारी तळमळ मी दिलेल्या दोनच डोसांनीं थांबली कीं नाहीं ? खरें असेल तें सांग.'

ज्ञानदेनें आधींच खालीं मान घातलेली होती. त्यांतच हा प्रश्न ऐकून तर तिचें तोंड जमिनीला मिळून जात आहे कीं काय असेंच वाटूं लागलें. तिची बाजू घेऊन रासमणी म्हणाली, 'तुमच्याशिवाय दुसऱ्या कुणाचा हिला विश्वासच वाटत नाहीं बाबा, तुमचें औषध म्हणजे हिला धन्वन्तरीच वाटतो ! पण हिचा आजार तो नव्हे बरं का प्रियनाथ. दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडल्या-मुळें या दळभद्रीला उलटाच आजार झाला आहे !'

प्रियनाथ आपला हात वर करून म्हणाले, 'उलटा नव्हे मावशी उलटा नव्हे. विपिन मितिरच्या हातीं पडली असती तर मात्र खात्रीनें आजार उलटला असता. पण आतां भिण्याचें कारण नाहीं. प्रिय मुखय्ये आहे हा.'

रासमणी कपाळाला हात लावून म्हणाली, 'तुम्हीं हिला वांचविलीत तर

भिण्याचें कारण नाहीं खरें; पण ही कपाळकरंटी इकडे स्वतःचा घात करून बसली आहे ना! आतां या वेळीं हिला योग्य असें एकादें औषध देऊन हिचा उद्धार तुम्हीं केला नाहीं तर कुळाला काळोखी लावील ना?'

प्रियनाथ स्वतःला मोठा चिकित्सक डॉक्टर समजत असून रासमणीच्या या बोलण्याचा विशेषतः शेवटच्या वाक्याचा त्याला स्पष्ट असा कांहींच अर्थ समजेना. रासमणीनें त्याच्या चेहऱ्यावरून हें जाणलें आणि स्वतःच्या सूचनेचा गर्भितार्थ त्यांना समजावून देण्यासाठीं तिनें प्रियनाथला जवळ जवळ ओढीतच त्या खोलीच्या कोंपऱ्यांत नेलें. नंतर त्याच्या कानांत अस्पष्ट आवाजानें ती चार दोन गोष्टी बोलली. आणि तिची कानगोष्ट ऐकतांच प्रियनाथ चमकून एकदम बोलले, 'म्हणतेस काय मावशी? ज्ञानदा—?'

* * *

## १४

मावशी लागलीच उत्तरली, 'तर काय सांगूं आणखी बाबा नशिबाला असेल तें कसें टळणार? कपाळावरचा लेख कोण पुसणार? तेव्हा प्रियनाथ, कसेंही करून हिला असें एकादें औषध दे कीं त्या योगानें गोलोक चाटुर्याची उंच असलेली मान खालीं वांकवावी लागणार नाहीं! चार लोकांत त्याला खालीं मान घालण्याचा प्रसंग येतां नये. त्याची मान वरच राहिली पाहिजे. कारण एकतर तो देशाचा अग्रणी आहे. शिवाय समाजाचा शिरोमणी! तसेंच तुम्हींच पहा. तो पुरुष माणूस! त्याला या बाबतींत कसा बरें दोष देतां येईल? आणि त्याचा अपराध तरी काय?' नंतर ती ज्ञानदेला उद्देशून म्हणाली, 'आणि अशा थोर निर्दोष माणसाच्या घरांत बसून कार्टे तूं हा घोटाळा कसा केलास सांग पाहूं?'

मावशीच्या बोलण्याकडे प्रियनाथचें लक्षच नव्हतें. तिची कान गोष्ट ऐकूनच त्याचा चेहेरा निस्तेज होऊन गेला. त्यानें एकवार ज्ञानदेच्या तोंडाकडे पाहाण्याचा निष्फळ प्रयत्न करून म्हटलें, 'मला वाटतें तुम्ही विपिन डॉक्टरला ही बातमी कळवाल तर बरें होईल मावशी! हीं असलीं औषधें माझ्याजवळ नाहींत आणि नसतात.' आणि हें स्वतःचें बोलणें पुरें होतें न होतें तोंच स्वारीनें खालीं वांकून औषधाची पेटी उचलली आणि खालीं ठेवलेलीं पुस्तकें ते एकत्र करूं लागले.

रासमणीला आश्चर्य वाटून ती म्हणाली, म्हणतोस काय प्रियनाथ? ही गोष्ट काय षट्कर्णी करण्यासारखी आहे! हजार गोष्टी बोलल्या तरी तूं आपला माणूस आणि किती झाला तरी विपिन परकी! शूद्र! भटाबामणाची मान मर्यादा, लाज अब्रू काय त्याच्या हातीं देऊन चालेल?'

मावशीच्या या प्रश्नाला प्रियनाथकडून उत्तर मिळण्यापूर्वीच अकस्मात् दार उघडून खुद्द गोलोक महाशयच तेथें आले आणि प्रियनाथचा डावा हात आपल्या हातांत घेऊन विनवणीच्या स्वरानें म्हणाले, वीष असेल या भीतीनें ही दुसऱ्या कोणाच्याच हातचें औषध घ्यायला तयार होत नाहीं बाबा, नाहीं तर तुला इतके श्रम दिले नसते. या संकटांतून मला सोडविलेंच पाहिजे प्रियनाथ!'

आपला हात सोडवून घेऊन प्रियनाथ म्हणाले, 'नाहीं. नाहीं. असल्या या घाणेरड्या कामांत मी पडणार नाहीं. रोगी पहातों आणि रेमिडी सिलेक्ट करतों एवढेंच माझें काम. बस्स. विपिन टिपीनला बोलावून या बाबतींत विचारविनिमय करा. त्याला काय हें असलें माहीत नाहीं?' बोलतां बोलतां त्यांनीं पुनः आपलीं पुस्तकें बगलेंत मारण्याचा उद्योग चालविला.

गोलोकनीं पुनः त्यांचा तो हात आपल्या हातांत ओढून घेतला आणि रडव्या स्वरानें म्हटलें, 'प्रियनाथ, या म्हाताऱ्याची ही गोष्ट एवढी मान्य कर बाबा. अरे, नात्यानें मी तुझा सासरा आहें. तूं माझें सांगणें ऐकणार नाहींस असें मला वाटलें असतें तर मी तुझ्याकडे बोललों नसतों ही गोष्ट. शपथ आहे तुला. एकदा उपाय काढ बाबा—'

प्रियनाथ पुनः आपला हात सोडवून घेऊन म्हणाले, 'नात्यानें सासरे आहां म्हणून काय मी तुमच्या सांगण्याप्रमाणें जीवहत्त्या करूं? चांगलेच दिसतां तुम्हीं! परलोकची कांहीं भीतीच नाहीं मला?'

गोलोक महाशय आतां दाराजवळ गेले. त्यांचा चेहरा, डोळयांतील भाव, बोलण्याचा स्वर एकदम बदलला. निमिषार्धात त्यांचा कायापालट झाला. अद्भुत जादूच झाली ती! त्यांनीं एकदम कर्कश स्वरानें प्रियनाथ बाबूंना विचारलें, 'इतक्या रात्रीं तूं घरंदाज गृहस्थाच्या घरांत कशाला शिरलास? इथें येण्याचें तुला काय कारण?'

**आकस्मिक विचारलेल्या या प्रश्नानें प्रियनाथ आश्चर्यचकितच नव्हे तर हतबुद्ध झाले! त्यांनीं म्हटलें, 'काय कारण? वाः फार चांगलें. रोगाचें निदान करायला कुणी बोलविलें? वाः—**

गोलोकनीं आपला स्वर शक्य तितका चढवून विचारलें, ' वाः रोगाचें निदान तुलारे काय कळतें हरामजाद्या ! हलकट कुठचा ! कुणी तुला बोलाविलें? कुठून घरांत शिरलास? मागच्या दरवाजा तुला कुणी उघडून दिला ?'

नंतर तीच स्वारी ज्ञानदेकडे वळून कडाडली, ' हरामजादी कुठची ! तरीच तो आंधळा सासरा रडून रडून परतून गेला. स्वतःला जायचें नाहीं असें सांगून वाटेला लावलास त्याला ! म्हातारी सासू मरायला टेंकली आहे, मी किती प्रकारानीं सांगितलें, ज्ञानदा, जा. या शेवटच्या घटकेला तरी तुझ्या हातून तिची सेवा घडूं दे. ' पण तूं कांहीं केल्या गेलीस नाहीं त्याचें कारण हेंच वाटतें ! मध्यरात्रीं रोगाचें निदान करायचें होतें तुला ! थांब हरामजादे, उद्यां जर तुझ्या मस्तकाचें मुंडन करून आणि त्यावर शेणकाला ओतून तुला गांवाबाहेर घालविलें नाहीं तर माझें नांव गोलोक चाटुय्येच नव्हे.'

ज्ञानदेच्या मस्तकावर या वेळीं पदरही नव्हता. तो केव्हां खालीं पडला याचें तिला भानही राहिलें नाहीं. तोंडांतून शब्दही उमटेना. दोन्ही डोळे ताठ उघडे होते. ते तिला मिटतांही येतना. जणुं काय ती म्हणजे एक दगडी पुतळीच बनली होती.

नंतर गोलोक महाशय रासमणीकडे वळून म्हणाले, ' रासू, तूं आपल्या डोळयांनीं पाहिलास ना हा यांचा प्रकार ? मी दहा गांवचा मालक. समाजाचा चालक. ब्राह्मण शिरोमणी ! माझ्या घरांत हें पाप ? वाघाच्या घरांत घुबडाचें बिऱ्हाड म्हणतात तें याला ! '

रासमणीलाही अजूनपर्यंत काय बोलावें हें सुचत नव्हतें. पण आतां तिला वाचा फुटली. ती त्या सुराला साथ देऊन म्हणाली, ' झालेंच हें तसें दादा ! '

गोलोक म्हणाले, ' मग याला तूं साक्षी आहेस बरं ! '

रासमणीनें उत्तर दिलें, ' आहे तर काय झालं ! मी म्हटलं, रात्रीचा थोडा विसावा मिळतो तेव्हां जावं आणि ज्ञानदेचें कसं काय आहे तें पाहून यावं ! इथं येऊन पहातें तर या दोघांच्या आपल्या मजेंत गोष्टी चालल्या आहेत !'

यावरही ज्ञानदा कांहीं बोलली नाहीं. ताठरलेल्या डोळयांनीं ती पहात राहिली. जणु काय बैठक घातलेली पाषाण मूर्तीच !

प्रियनाथ घाबरल्यासारखा होऊन आश्चर्यानें या सगळया प्रकाराकडे पहात होता. गोलोकनीं तितक्यांत त्याच्यावर झडप घातली आणि त्याच्या हातांतील पुस्तकें काढून घेऊन मानेवर जोराचा धक्का दिला आणि म्हटलें,

‘चालता हो पाजी हलकटा माझ्या घरांतून ! काय बोलायचें ! तूं रामतनू बांडुय्येचा जांवई झालास नाहींतर व्हाणांच्या मारानें तुला अर्धमेला करून पोलिस ठाण्यावर पाठविला असता.’ असें म्हणून प्रियनाथबाबूंना आणखी एक धक्का दिला. आणि ही गडबड ऐकून दाराबाहेर जमा झालेल्या चाकर नोकरांच्या मधून त्याला लोटीत लोटीत घराबाहेर घेऊन गेले.

जातां जातां प्रियनाथ बोलतच होते, ‘वा: ठीक. मजाच आहे म्हणायची ही—’

चाकरनोकर दासी वगैरे मंडळीही मागोमाग गेली. आणि ही संधी साधून रासमणीही त्यांच्या मागून मुकाट्यानें पसार झाली.

राहिली केवळ ज्ञानदा ! ती मात्र जशीच्या तशीच निश्चल, शब्दहीन आणि एकाद्या अचेतन दगडी मूर्तीप्रमाणें बसून होती !

* * *

## १५

आज सगळ्या दिवसभर जवळून आणि दुरून सनईचे करुणापूर्ण सूर मधुन मधुन ऐकूं येत होते. वाऱ्याच्या वाहातुकीप्रमाणें ते जोरदार अगर मलूल असत इतकेंच. मार्गशीर्षांतील हा दिवस म्हणजे लग्नाच्या मुहूर्तांचा एकच एक दिवस. यानंतर अस्त. नंतर लग्नें होणें शक्य नाहीं आणि गांवांत त्या मुळेंच बहुधा चार पांचशें घरांत लग्नाची धांदल चालली असावी. आणि सावधानतेचे हे सूर असावेत. आज गोरज मुहूर्तावर लग्नांची गर्दी.

निरनिराळ्या कारणांनीं अरुणाला अजूनपर्यंत घर आणि जन्मभूमी सोडण्याचा बेत तडीला नेतां आला नाहीं. संकल्प लवकर करतां येतो पण कार्यसिद्धी लवकर होतेच असें नाहीं. कारण ती परस्वाधीन असते. त्यानें पूर्वीप्रमाणें कामकाजही सुरू केलें होतें. बाहेरून पहाणाऱ्याला त्याच्या जीवनांत कांहीं फरक झाला आहे असें कुणालाच वाटत नसे. पण त्याच्या थोडाशा आंतरिक व्यवहाराकडे लक्ष्यपूर्वक कोणी पाहिल्यास, या गांवांत त्याचें मन गुंतून रहायला तयार नाहीं, या गांवासंबंधानें त्याच्या मनांत प्रेम नाहीं असेंच कळून आलें असतें. ज्या सगळ्या हितकारक गोष्टींशीं त्याचा अत्यंत निकट संबंध होता, त्या सगळ्या गोष्टी त्यानें आंगाबाहेर टाकल्या होत्या. त्याच्या मनाची ओढ कमी झाली होती. तो बाजूला सरला होता.

गांवांत आज इतकीं लग्नें असून एकाही लग्नाला त्याला कोणी बोलाविलें नव्हतें. त्याच्यावर बहिष्कार टाकला होता. समाजाशीं त्याचा कोणताही कसलाच संबंध आहे असें कुणाला वाटत नव्हतें. आज सर्वांचे दरवाजे त्याला बंद होते. गांवांत सामाजिक बहिष्काराचा केवढा हा प्रताप !

सायंकाळ झाल्यापासूनच तो आपल्या घरांतील दुसऱ्या मजल्यावरच्या लिहिण्या वाचण्याच्या खोलींत मुकाट्यानें बसून होता. सायंकालीन शीतल वारा सुटला असतांही त्यानें घराच्या खिडक्या व दरवाजे बंद करून घेतले नव्हते. सगळे उघडे असल्यामुळें घर कसें भकास दिसत होतें. निर्मेघ आणि निर्मल असलेल्या आकाशांत एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे त्रयोदशीचा चंद्र आपल्या प्रकाशाचा झोत घेऊन चालला होता. आणि त्यांतीलच कांहीं किरण, मागच्या मोकळ्या खिडकींतून येऊन त्याच्या पायाशीं पडले होते. समोरच दिसणाऱ्या उघड्या पडवीबाहेर असलेल्या माडाच्या झाडावर पानापानांतून पडलेले चंद्रकिरण चकमक करीत होते. त्या चमकणाऱ्या पानाकडे पाहून अर्ध जाग्रत आणि अर्धवट झोंपेंत असल्यासारखा विमनस्क अरुण कसला विचार करीत होता, तें त्याचें त्यालाही कळत नव्हतें. मनाचे व्यापार आणि नजरेचें लक्ष्य यांत फरक असला म्हणजे हा असा प्रकार नेहमींच होत असतो. मनाची बधिरता आणि दृष्टीची शून्यता असें याला नांव दिल्यास तें अधिक शोभेल. आणि वस्तुस्थितीचेंही निदर्शक ठरेल.

आचारी स्वयंपाक तयार असल्याची वर्दी देण्यासाठीं वर आला तेव्हां ‘ मला भूकच नाहीं ’ असें सांगून अरुणानें त्याला परतून लावला. तसेंच भिंतीला लावलेल्या अष्टौप्रहर जागृतीचा इषारा देणाऱ्या घड्याळानें ठणाणून अकराचे ठोके वाजवून काळ वेळाचीही आठवण दिली, निजण्याची वेळ झाली असें सांगितलें; पण बसल्या जाग्यावरून हालचाल करण्याची त्याला इच्छाच होईना. तो जसा होता तसाच निःशब्दतेनें बसून राहिला.

अकस्मात् पुढच्या दरवाजाला कुणीतरी धक्का दिल्याचें व दुसऱ्याच क्षणीं दरवाजा उघडल्याचें त्याच्या कानावर आलें. एकवार त्याला वाटलें ‘ हांक मारून कारण विचारावें.’ कारण खेडें गांवांत इतक्या अपरात्रीं विनाकारण कोणी कुणाच्या घरीं जात येत नसतें; पण तसें कांहीं विचारण्याचा उत्साहच नसल्यामुळें तो हेतू मनांतल्या मनांतच राहिला.

पण ज्यास्त वेळ त्याला विचार करीत राहावें लागलें नाहीं. थोड्याच

वेळांत त्या खोलीच्या दरवाजांत नव्या रेशमी साडीचा जोरदार खसखस आवाज झाल्याचें आणि त्या बरोबरच तुफानी हवेच्या झोताप्रमाणें कोणी तरी आत येऊन त्याच्या पायांजवळ तोंड खालीं करून पडल्याचें त्याच्या अनुभवाला आलें.

अरुण चमकला. आणि गडबडीनें उठून उभा राहिला. पहातो तों, त्या उपडी पडलेल्या माणसाच्या आंगावर असलेलें रंगदार वधूवस्त्र चांदण्यांत चमचम करीत आहे असें त्याला दिसलें. हें माणूस कोण असावें हें त्यानें तेव्हांच जाणलें आणि ती जाणीव होतांच भीतीनें आणि विस्मयानें त्याचें अन्तःकरण त्याच क्षणाला एकदम सुन्न गेलें. तो घाबरला. ही आतां काय करील, काय बोलेल याचा त्याला कांहींच अंदाज होईना.

पण हा अंदाज करायला तरी त्याला वेळ कुठें होता? एका भयानक आणि मर्मभेदक अशा दबलेल्या रडण्याच्या हुंदक्यांनीं अकस्मात् त्या खोलींतील हवा, खोलींतील अंधार, खोलींतील क्षीण प्रकाश हें सगळें कांहीं झणझणून गेलें. अन्तर्बाह्य आक्रंदनाचे सूर प्रतिध्वनित होऊं लागले.

दोन एक मिनिटें हतबुद्ध झाल्याप्रमाणें निःशब्द राहून अरुण थोडासा बाजूला सरला आणि म्हणाला, ' संध्या, आहे काय प्रकार?'

संध्येनें तोंड वर करून त्याच्याकडे पाहिलें. तिच्या नेसलेल्या रेशमी वधूवस्त्राबरोबरच तिच्या आंगावरील भरदार सुवर्णालंकार चांदण्याच्या स्निग्ध प्रकाशांत चमकूं लागले, तिच्या सुंदर भालप्रदेशावर चंद्रकिरण पडून चंदनाची पत्रलेखा उठून दिसूं लागली. आणि त्या पत्रलेखेखालींच ओथंबून आलेले तिचे अश्रुभाराक्रांत नेत्र हिरकणीप्रमाणें चमचम करूं लागले. स्त्रीचें असलेलें अनुपम सौंदर्य अरुणनें केव्हांच पाहिलें नव्हतें त्यामुळें तो अगदीं मुग्ध होऊन गेला.

संध्या म्हणाली, ' अरुण, मी पाटावर उभी राहिलें होतें तेथून तुला नेण्यासाठीं पळून आलें आहे. आज मला लाज नाहीं. भय नाहीं, मान-अपमान जाणवत नाहीं कांहीं नाहीं. तुझ्यावांचून या जगांत माझें कांहीं नाहीं—कोणी नाही—तूं चल.'

' कुठें येऊं?'

' ज्या ठिकाणाहून नुकताच एक मनुष्य उठून गेला त्या वराच्या आसनावर!'

काय झालें तें अरुणानें मनोमन जाणलें आणि त्याला दुःखही वाटलें. कांहीं तरी भांडण होऊन वरपक्षीय मंडळी जबरदस्तीनें वराला उठवून गेली असली पाहिजे. हिंदु समाजांत अशा घडणाऱ्या गोष्टी कांहीं थोड्याथोडक्या नाहींत! आणि त्या परित्यक्त आसनावर बसण्यासाठीं मला बोलविण्यांत येत आहे! कांहीं झालें तरी आज संध्येचा विवाह झालाच पाहिजे.

वास्तविक अरुणाच्या बाबतींत हें आवाहन—टाकलेल्याचा स्वीकार करण्यासाठीं बोलविणें—अपमानकारक होतें. पण आघाताला प्रत्याघात हें त्याचें ब्रीद नव्हतें. तो तशा प्रकारचा माणूस नव्हता. आणि त्यामुळेंच तो संध्येला धमकावून प्रेमळतेनें म्हणाला, ‘ छे. छे. तूं स्वतः आलीस हें बरें केलें नाहींस संध्ये! असे प्रकार बहुतेक ठिकाणीं घडतातच. तुझे वडील किंवा आणखीं दुसरें कोणीं येऊं शकलें असतें.’

‘ बाबा ते तर भीतीनें कुठें लपून राहिले आहेत माहीतच नाहीं. आई स्वतः पुष्करणींत उडी टाकायला धांवली, तिला कशी बशी तेथून उचलून आणली. आणि मी तेव्हांच तुझ्याकडे धांवत आलें. अरेरे. अशा प्रकारचा सर्वस्वी घात जगांत कधीं कुणी कुणाचा केला असेल असं कांहीं मला वाटलं नाहीं. असें कधीं झालें आहे? आम्हीं आतां जगावें तरी कसें?’

तिच्या या शेवटच्या वाक्यानें अरुणाच्या कोमल अन्तःकरणावर पुनः आघात झाला. त्यानें म्हटलें, ‘ पण माझ्याकडून तर तुझ्या कुलीनत्वाचें रक्षण होणार नाहीं संध्या, मी ब्राह्मण असलों तरी बहिष्कृत आहें! तसें पाहिलें तर गांवांत काय आणखीं कुलीन ब्राह्मण नाहींत? कदाचित् तुझे वडील अजून त्याच तपासांत असतील आणि त्यांना तसा कोणी—’

संध्या रडत रडत म्हणाली, ‘ नाहीं. नाहीं. नाहीं रे अरुण. बाबा कुठेंही गेले नाहींत. ते भीतीनें कुठें तरी लपले आहेत. माझा आतां कोणी स्वीकार करणार नाहीं. माझ्याशीं कोणी लग्न करणार नाहीं. केवळ तुझेंच तेवढं माझ्यावर प्रेम आहे. स्वतःच्या अन्तःकरणांत कुणी मला कायमची जागा दिली असेल तर ती केवळ तूंच.’

वय आणि परिस्थिती याच्या मानानें तिचें हें बोलणें अरुणाला फारच उच्छृंखलपणाचें वाटलें. तिला हाताला धरून उठवावें म्हणून त्यानें तसा प्रयत्न केला तेव्हां संध्या त्याला अडथळा करून म्हणाली, ‘ नाहीं. मी उठ-णार नाहीं. शक्य तितका वेळ मी तुझ्या पायाशींच पडून राहणार. माझ्या

कुलीनत्वाचें रक्षण करण्याबद्दल तूं म्हणालास नाहीं का? कुणाचं कुलीनत्व राखायचं अरुण? मी तर कोणा **ब्राम्हणाची मुलगी नव्हे!** मी न्हाव्याची मुलगी! आणि तीही रीतसर झालेली नव्हे. आज आतां माझ्या हातचें पाणीही कुणी पिणार नाहीं. ओः देवा, मला इतकी भयंकर शिक्षा तूं कां दिलीस बरें? मी असें तुझें काय केलें होतें?'

तिच्या बोलण्यानें अरुण चमकला. त्याला तेव्हांच वाटलें कीं ही बेभान झाली असली पाहिजे. कदाचित् भयंकर प्रसंगांत सांपडल्यामुळें डोकें भडकून ही कांहींच्या कांहींच बरळत असावी. कदाचित् असा कांहीं विलक्षण प्रकार घडलाही नसेल. मनासारखें होत नाहीं म्हणून अखेरच्या घडीला ही पळून आली असावी. आणि हिच्या अशा नाहींशा होण्यानें लग्नमंडपांत मोठी गडबड उडून गेली असेल. त्याला असें वाटल्यामुळें त्यानें तिला थाऱ्यावर आणण्यासाठीं तिच्या मस्तकावर हात ठेवून आत्यंतिक प्रेमळतेनें म्हटलें, 'बरं. चल. संध्या, तुला मी तुझ्या घरीं घेऊन जातों.'

संध्या त्याच्या पायांवर डोकें ठेवून व त्याची पायधूळ आपल्या मस्तकास लावून म्हणाली, 'चल. तूं येशील हें मला माहीतच होतें. पण माझें सगळें बोलणें ऐकून घे आणि नंतर चल. नाहींतर कदाचित् तूंही—तुला त्या दिवशीं मी काय म्हणालें होतें? हलक्या जातीचा ब्राह्मण. नव्हे? मला वाटतें त्या पापामुळेंच आज मीही ब्राह्मणाची मुलगी नव्हे असें सप्रमाण ठरलें. छे. छे. मी हें कसें सहन करूं? आणि सहन करून जिवंत तरी कशी राहूं?'

* * *

## १६

तिची होणारी ती मानसिक तळमळ आणि त्यामुळें तिला होणाऱ्या यातना पाहून अरुणाचें दयार्द्र अन्तःकरण द्विधा झालें. त्याला वाटलें, तेथें खरोखरच कांहीं तरी विलक्षण प्रकार घडला असला पाहिजे. कदाचित् ही जो प्रकार सांगत आहे तो खराही असेल. झालें आणि पाहिलें तेंच ही सांगत आहे. त्यानें तिला धीर स्वरानें विचारलें, '**ही गोष्ट सप्रमाण आहे असें कोणी ठरविलें?'**

‘ कोणी ? गोलोक चाटुर्य्यानें. होय त्यानेंच. त्यानें मला काय विचारलें होतें आणि मी त्याला काय जबाब दिला होता हें तुला माहीत आहे ? माहीत नाहीं ? बरं. राहूं दे तर ती गोष्ट, तिचा पुनरुच्चार नको. आतांच काय झालें तें ऐक. आई कन्यादानाला बसली होती. आजी एकीकडे उभी राहून हा धार्मिक विधी पहात होती. इतक्यांत मृत्युंजय घटक आपल्याबरोबर दोन माणसें घेऊन तेथें आला. त्यांतील एकानें माझ्या आजीकडे पाहून म्हटलें, तारा आक्का मला ओळखतेस तूं ? नंतर दुसरा माझ्या आईकडे बोट दाखवून आजीला म्हणाला, तूं आपल्या मुलाचें हिच्याशीं लग्न करून या ब्राह्मणाच्या मुलीची जात नाहींशी केलीस आणि नातीचें लग्न करून दुसऱ्या एका ब्राह्मणाला आपल्या जातींतून उठवीत आहेस काय ? नंतर माझ्या वडलांकडे बोट करून तो सर्वांना उद्देशून म्हणाला, तुम्हीं सगळे ऐका प्रियमुखर्य्ये म्हणून ज्याला तुम्हीं कुलीन ब्राह्मण समजतां, तो ब्राह्मण नसून हिरू न्हाव्याचा मुलगा आहे.—’

‘संध्ये, संध्ये, तूं हें काय बडबडत आहेस ?’ अरुणनें मध्येंच प्रश्न केला.

पण संध्येनें हा त्याचा प्रश्न ऐकलाच नसावा. स्वतःच्या बोलण्याचा संदर्भ धरून ती पुढें म्हणाली, ‘ मृत्युंजय घटकानें गंगाजल भरलेला कलश आजीच्या पुढ्यांत ठेवून विचारलें, बोल हें खरें आहे कीं नाहीं ? सांग. हा कुणाचा मुलगा ? मुकुंद मुकर्जीचा कीं हिरू न्हाव्याचा ? बोल......अरुण, अरुणदादा, माझी ती वृद्ध आणि विरक्त आजी कांहीं न बोलतां खालीं मान घालून उभीच राहिली. कांहीं केल्या तिच्यानें खोटें बोलवेना. काय सांगूं ! अरुण, सत्य. सत्य. भयंकर सत्य होतें तें, खरंच तूं मला जशी समजतोस तशी मी नाहीं. तुझी ही संध्या ब्राह्मणाची मुलगी नव्हे !

आतां मात्र अरुणाच्या अन्तःकरणांत संशयाचा लेशही राहिला नाहीं. तो एकाद्या वज्राहताप्रमाणें निश्चल निस्तब्ध होऊन उभाच राहिला.

संध्या सांगूं लागली, ‘ नंतर त्यांतीलच एकानें या भयंकर सत्यकथेचा खुलासा केला. तो आजीच्या गांवचा मनुष्य होता. तो म्हणाला, वयाच्या आठव्या वर्षी आजीचा विवाह झाला. त्यानंतर चौदा पंधरा वर्षांनीं एक मनुष्य आला. मुकुंद मुखुर्य्ये जांवई तो मीच असें सांगून घरांत शिरला. दोन दिवस जांवई या नात्यानें तो राहिला. नंतर पांच रुपये आणि एक धोतरजोडा घेऊन निघून गेला ! हाय रे देवा !!’

अरुण जशाचा तसाच तटस्थ उभा होता.

संध्येचा वाक्प्रवाह चालूच होता. ती म्हणाली, ' काय मी सांगत होतें अरुणदादा ? आठवतें ? हां आठवलें. त्यानंतर तो मनुष्य मधुन मधुन येऊं जाऊं लागला. माझी आजी तारुण्यांत अत्यंत सुंदर दिसे. तो तिच्याकडून पैसे घेत नसे. त्यानंतर एके दिवशीं जेव्हां तो खरोखरच कोण आहे हें कळलें, तेव्हां माझ्या बाबांचा जन्म झाला होता. अरेरे ! मी आई असतें तर त्या वेळींच त्या अर्भकाचा गळा दाबून प्राण घेतला असता. त्याला वाढूं दिलें नसतें. हं काय सांगत होतें मी ? '

अरुण अस्पष्ट स्वरानें म्हणाला, ' तो कोण आहे तें कळलें—'

संध्या सांगूं लागली, ' होय. तेंच. कोण आहे तें कळलें. त्याला पकडून विचारलें तेव्हां त्यानें काय जबाब दिला माहीत आहे ? तो म्हणाला, मी हा भ्रष्टाकार आपण होऊन केलेला नाहीं. माझा मालक मुकुंद मुखय्ये याच्या आज्ञेवरूनच केला आहे. एकतर तो म्हातारा माणूस त्यांत पांचसात वर्षें वातविकारामुळें पांगळा झालेला—त्यामुळें आपल्या अपरिचित बायकांकडून पैसा वसूल करण्याचा भार त्यानें माझ्यावर सोंपविला, आणि म्हटलें, हिरू, तूं ब्राह्मण म्हणून कशी ओळख द्यावी, गोत्र प्रवर कसा सांगावा तें पाठ कर. एक जानवें नेहेमीं आपल्या जवळ तयार ठेव. आणि माझ्या प्रत्येक सासुरवाडीला जा. तिथून जें कांहीं तूं मिळवून आणशील त्यांतील निम्मे तुझें.'

अरुणनें विस्मयचकित होऊन विचारलें, ' आणखीही अनेक ठिकाणीं त्यानें हेंच काम केलें होतें वाटतें ? '

' होय.' संध्या सांगूं लागली, आणखीही दहाबारा ठिकाणाहून तो आपल्या मालकासाठीं असाच रोजगार करून पैसे मिळवून आणीत असे. त्यानें आणखीं काय सांगितलें होतें माहीत आहे, म्हणाला, यांत नवीन असें कांहीं नाहीं आणि केवळ माझाच एकटा मालक करतो असेंही नाहीं. तर असे अनेक ब्राह्मण दूर दूर असणाऱ्या आपल्या सासुरवाडीहून दुसऱ्या मार्फतच पैसे आणतात—'

अरुण क्रुद्ध होऊन ओरडून म्हणाला, ' आहे. संभवनीय आहे. पुष्कळसें खरेंही असेल. नाहीं तर उच्च ब्राह्मण कुलांत गोलोक सारखे कसाई कसे जन्माला आले असते ? आणि असें असून समाज शिरोमणी समाज शासक म्हणून हेच हिंदु समाजाच्या डोक्यावर बसले आहेत ! बरं त्यानंतर—'

' नंतर आजी माझ्या बाबांना घेऊन काशीला गेली. त्या दिवसापासून

तिनें आपलें आयुष्य विरक्तावस्थेंत घालविलें. ती संन्यासिनी झाली. तिनें आपलें तोंड कुणालाही दाखविलें नाहीं.'

थोडा वेळ थांबून संध्या म्हणाली, ' हिरूनें म्हणे आपल्या त्या मालकाला विचारलें होतें, भटजी महाराज, परलोकीं मीं काय जबाब देऊं ? त्यावेळीं त्याचा तो मालक म्हणाला, तें माझें पाप आहे मी त्याचा जबाब देईन. नंतर हिरूनें विचारलें, ' त्या बिचारीची काय गत होईल भटजी ? ' त्यांनीं त्यावर हंसून म्हटलें, ती माझी बायको आहे. तुझी नव्हे. तुला तिचा इतका कळवळा काय म्हणून ? अरे, जिला डोळयांनीं पाहिलें नाहीं, कधीं पहायचें नाहीं, तिची गती काय होईल आणि काय होणार नाहीं त्याची काळजी मी कशाला करूं ? आणि तूं तरी कशाला करतोस ? मला चिंता पैसे कसे मिळतील हीच.

' अरुण, आणि म्हणूनच माझी आजी त्या दिवशीं तुझी गोष्ट काढून रडत रडत म्हणाली होती, संध्या, जातीनें कोण श्रेष्ठ आणि कोण नीच हें एका ईश्वरालाच माहीत. मनुष्यानें कधींच कुणाला हीन नीच म्हणून त्याचा तिरस्कार करूं नये. पण त्यावेळीं या तिच्या म्हणण्याचा अर्थ मला कळला नाहीं. आज अशा रीतीनें मला तो समजायचा होता !...पण अरुण, आतां रात्र वाढत चालली. माझा स्वीकार केलास तर तुला कधीं दुःख सहन करावें लागणार नाहीं. तुझें महत्त्व, तुझा त्याग मी या जन्मीं तरी विसरणार नाहीं.' असें बोलून ती टक लावून अरुणकडे पहात राहिली.

अरुण अनिश्चित स्वरानें आणि कांहीशा संकोचानें तिला म्हणाला, ' पण यावेळीं तर तुला बरोबर घेऊन मी जाऊं शकत नाहीं संध्या ! '

संध्येनें चकित होऊन विचारलें, ' कां ? तूं बरोबर नाहीं आलास तर मला उभें राहायला जागा कुठें आहे ? मी वांचणार कशी ? '

संध्येनें अत्यंत व्याकूळतेनें विचारलेल्या या प्रश्नाचा जबाब काय द्यावा हें अरुणाला समजेना. अगदीं आकस्मिक उद्भवलेल्या प्रसंगाचा, कायमच्या जबाबदारीचा हा प्रश्न होता. त्याचें उत्तर त्याला एकदम कसें देतां येणार ? आणि म्हणूनच तो धीर स्वरानें म्हणाला, ' आज मला क्षमा कर संध्या. थोडा विचार करायला अवधी दे. '

' विचार करायला ? ' एवढा एकच शब्द उच्चारून व थक्क होऊन संध्या अरुणाच्या तोंडाकडे पहात राहिली. तिनें टक लाविली होती जणुं काय त्या

अंधारांत शक्य असेल तितकी दृष्टी ताणावून अरुणचा चेहरा स्पष्ट रीतीनें पहाण्याचा तिनें प्रयत्न चालविला होता. नंतर एक गंभीर दीर्घ निःश्वास सोडून हळूहळू ती उठून उभी राहिली आणि म्हणाली, ठीक आहे. कर विचार थोडा कां पुष्कळ विचार कर. जन्मभर तुला विचार करायला वेळ मिळेल. इतके दिवस मीही विचारच करीत होतें. रात्रंदिवस एकच विचार चालला होता. शेवटीं जेव्हां स्वतःच्या मानानें तुला बरोबरीच्या सीमारेषेवर आणणें कठीण नाहीं असें मला वाटलें तेव्हां जो विचार ठरला तो मी तुलाच सांगितला. उघडपणानें बोललें. याचना केली. आतां तुझी विचार करण्याची वेळ आली आहे ! ठीक आहे ! निघालें मी—' असें म्हणून ती चालूं लागली तेव्हां आंगावरील पाघरलेलें लांबचलांब वधूवस्त्र एकदम जमिनीवर पडलें. लागलीच तिनं ते उचललें. पण जेव्हां सर्वांगावर ती तें घेऊं लागली तेव्हा स्वतःकडे तिचें लक्ष गेलें. लागलीच ती अंग शाहारून म्हणाली, 'देवा' हें मंगलवस्त्र, अंगभर असलेले दागिने, भालप्रदेशावर चमकणारी ही चंदन लेखा या सगळ्या गोष्टी स्वीकारतांना असें होईल याचा विचार कुणी केला होता !' पुढें तिच्यानें बोलवेना. गळा भरून आला. तोंडून शब्दच उमटेना शेवटीं मोठ्या प्रयत्नानें आंवढा गिळून विकृत स्वरानें ती बोलली, 'मी आतां निघालें अरुणदादा,' बोलतां बोलतां तिनें अरुणाला एकवार नमस्कार केला आणि ती तशीच मुकाट्यानें बाहेर पडली.

अरुण निश्चलतेनें उभाच होता. पण संध्या दृष्टीबाहेर निघून जातांच अकस्मात् तो भानावर आला. काळवेळ आणि परिस्थिती त्यानें जाणली, आणि व्यग्र व्याकूलतेनें नोकराला वारंवार हांका मारून तो म्हणाला, 'शिवू, जा, जा, बरोबर जा. पण असें बोलतां बोलतां तो स्वतःच तिच्यामागून बाहेर पडला. कृती आणि बोलणें याचा त्याला मेळच घालतां येईना.

* * *

## १७

डाव्या हातांत दिवा घेऊन प्रिय मुखय्ये कसल्याशा कित्येक वस्तू पेटींतून शोधशोधून एका लहानशा फडक्यावर ठेवीत होते. तितक्यांत मागच्या बाजूनें 'बाबा,' अशी हांक त्यांना ऐकूं आली.

प्रिय मुखर्ज्ये यांनीं हें काम अगदीं गुप्तपणानें म्हणून चालविलें होतें. हांक ऐकतांच गडबडीनें त्यांनीं दिवा खालीं ठेवला आणि चटकन् उठून त्यांनीं आवाज दिला, ‘ कोण, संध्या ? हं. हें झालंच. बाळे, निघालोंच मी–जास्त वेळ लावीत नाही. ’

येणारे अश्रू मोठ्या प्रयत्नानें आवरून धरीत संध्येनें विचारलें, ‘ काय करीत होतां बाबा ? ’

प्रियनाथ काहींसे संकुचित होऊन अवघडलेल्या स्वरानें म्हणाले, ‘ मी ? कांहीं नाहीं. कुठें काय ? कांहींच नाहीं ग बाळे ! ’

जमिनीवर पसरलेल्या फडक्याकडे बोट करून तिनें विचारलें, ‘ त्यांत काय बाबा ? काय ठेवीत होतां ? ’

मुद्देमालानिशीं पकडले गेल्यामुळें प्रियनाथांना अत्यंत संकोच वाटला. ते शरमिंदे झाले. नंतर कांहींशा अजीजीच्या स्वरानें त्यांनीं म्हटलें, ‘ विशेष नाहीं अगदीं थोडीं. हीं बघ. फारच थोडीं औषधें बरोबर घेत होतों. आणि हा मटेरिया मेडिका. मोठा नव्हे. धाकटा. फाटून सवरून गेलेला आहे अगदीं अनोळखी जागेंत जाणार. तेव्हां कांहीं नाहीं म्हटलें, थोडीशी प्रॅक्टिस तर केली पाहिजे ? तेव्हां विचार केला—’

‘ आई काय तुम्हांला एवढंही देईना होय ? ’

प्रियबाबूनीं मस्तक हालवून अनिश्चितपणें कांहींसें म्हटलें—पण काय म्हटलें तें कांहीं चांगलेंसें समजलें नाहीं.

संध्येनें विचारलें, ‘ तुम्हीं कुठें प्रॅक्टिस करणार बाबा ? ’

‘ वृन्दावन येथें. तिथें कितीतरी यात्रेकरू जातात येतात. त्यांना औषध-पाणी दिल्यानें काय महिन्याला चारपांच रुपयेही मिळणार नाहींत ! आणि तेवढे मिळाले म्हणजे माझें ठीक चालेल. ’

‘ खूब रुपये मिळतील बाबा. तुम्हांला कां नाहीं मिळणार ? पण तिथें तर तुमची कोणाची ओळख नाहीं. मग ? परवां ? पहांटे जेव्हां आजी काशीला निघून गेली तेव्हांच कां नाहीं तुम्हीं तिच्याबरोबर गेलां ? ’

‘ आईबरोबर ? काशीला ? नाहीं बाळ. मी आतां कुणाचाच माझ्याशीं कांहीं संबंध ठेवूं इच्छित नाहीं. माझ्यामुळें कुणाचाच घोंटाळा व्हायला नको. माझ्यामुळें सर्वांना पुष्कळच दुःख सहन करावें लागलें. आतां मी

कुणालाच कष्ट देणार नाहीं. जितके दिवस जिवंत राहीन तितके दिवस असाच अनोळखी जागीं एकटाच राहून दिवस घालवीन.'

संध्या बापाजवळ आली. तिनें अगदीं त्याच्या हृदयावरच मान ठेविली आणि त्याचे दोन्हीं हात आपल्या हातांत घेऊन म्हणाली, 'पण बाबा, मी तर तुम्हांला एकटे राहूं देणार नाहीं! मीही तुमच्याबरोबर येणारच.'

प्रियबाबूंनीं हळूहळू तिच्या हातून स्वतःचे हात सोडवून घेऊन मुलीच्या मस्तकावर ठेवीत हंसून म्हटलें, 'चल वेडी कुठली? असें काय कधीं झालें आहे? माझ्याबरोबर तूं कुठें जाणार बाळ! तुझ्या आईजवळ तूं रहा. तिनेंही आजवर पुष्कळ दुःख सहन केलें आहे. माझें नाव घेऊन जे औषध मागायला येतील त्यांना तूं औषध दे, आणि हें बघ संध्या, माझीं पुस्तकें जर तुझ्या आईनें दिलीं तर तीं विपीनला देऊन टाक. तो बिचारा गरीब आहे. त्याला पुस्तकें घेतां न आल्यामुळें त्याचें शिक्षणही तितकेंसें झालें नाहीं.'

संध्या नकारात्मक मस्तक हालवून म्हणाली, 'नाहीं बाबा. मी तुमच्या-बरोबर येणारच. हें पहाना. माझीं नेसायचीं दोन लुगडीं मी टॉवेलांत बांधून घेतलीं आहेत.' बोलतां बोलतां पदराखालीं लपविलेलें एक लहानसें गाठोडें काढून त्यांना दाखविलें.

प्रियनाथ बाबूंना वादविवाद करण्याची अगर प्रत्युत्तरें देत बसण्याची मुळींच संवय नव्हती. तिचें म्हणणें मान्य करून ते म्हणाले, 'बरं चल, पण तुझ्या आईला फार दुःख होईल ना बाळ!'

काल सर्वांसमोर, समाजांतील सर्व प्रमुख लोकांदेखत वडलांचा झालेला कमालीचा अपमान आणि उपहास संध्येनें पाहिला होता. स्वतःच्या डोळ्यां-देखत घडलेल्या त्या गोष्टी तिला विसरता येत नव्हत्या. जगद्धात्रीचें–तिच्या आईचें स्वतःचें–घर असल्यामुळेंच लोकांकडून झालेला हा अपमान त्यांना सहन करावा लागला. संध्येच्या ध्यानांत ही गोष्ट प्रामुख्यानें आल्यामुळें तिच्या रोमरोमांतून त्याची जाणीव होत होती. वडलांची ती अवहेलना केवळ परस्वाधीनतेमुळें झाली, हें ती विसरली नाहीं; पण यावेळीं त्या गोष्टीचा मुळींच उल्लेख न करतां तिनें वारंवार नकारात्मक मान डोलवून म्हटलें, 'नाहीं बाबा, मी कांहीं केल्या रहाणार नाहीं. मी तुमच्याबरोबर येणारच. मी बरोबर नसलें तर तुमची देखरेख कोण करणार? स्वयंपाक करून कोण वाढणार?'

बोलतां बोलतां तिनें वडलांनीं बाहेर काढलेलीं औषधें व पुस्तकें बांधून टाकलीं आणि ती उचलून व वडलांचा हात धरून ती म्हणाली, ‘ चला बाबा. आम्हीं याच वेळीं जायला निघूं. नाहीं तर बाराची गाडी आम्हांला मिळणार नाहीं.’

जगद्धात्री खोलीचें दार बंद करून घेऊन ती आंत बसली होती. संध्येनें बाहेरूनच त्या दाराच्या उंबऱ्यावर आपलें मस्तक नमविलें आणि नमस्कार करून ती म्हणाली, ‘ आई, आम्हीं निघालों. फक्त नेसणीच्या दोन लुगड्यांखेरीज मी तुझें कांहींही घेतलें नाहीं.’ बोलतां बोलतां तिला रडें कोसळलें. ती रडूं लागली. पण आंतून कसलाच आवाज अगर शब्द बाहेर आला नाहीं. तेव्हां घाईघाईनें तिनें आपल्याच पदरानें स्वतःचे डोळे पुसून म्हटलें, ‘आई, तिरस्कार, निंदा आणि यातना यांच्या काळोखीनें सगळें तोंड काळें करून, तोंडाला काळोखी फासून मी तुझा निरोप घेतें. तुझ्या समाजांत त्याचा न्याय होणार नाहीं. पण ज्यांच्या महापातकाचा बोजा घेऊन आम्हांला आज जावें लागत आहे, त्यांचा न्याय करणाराही कोणी एक आहे, आणि त्यालाच कधीं कधीं हें चांगलें समजूं शकेल. तो उत्तम प्रकारें जाणल्यावांचून आणि जाणवल्यावांचून राहणार नाहीं.

घरांत सर्वत्र निस्तब्ध होतें. दरवाजाही बंदच होता. संध्या हळूहळू बापाच्या मागून मागून सदर दरवाजा ओलांडून बाहेर आली. सर्वत्र काळोख आणि निस्तब्धता यांचें साम्राज्य पसरलेलें होतें. बापाचें आणि मुलीचें तें निर्याण कोणी पहात असेल का ?

* * *

## १८

होय. कोणीतरी एक मनुष्य जवळच्याच झाडाखालीं उभा होता. तीं दोघें रस्त्यानें चालूं लागलीं तेव्हां तो जवळ आला. जवळ येतांच तारकांच्या स्निग्ध प्रकाशांत प्रियनाथबाबूंनीं त्याला ओळखून विचारलें, ‘ कोण, अरुण नव्हे का ? ’

अरुणच होता तो. त्यांचा तो प्रश्न ऐकून त्यानें उत्तर दिलें, ‘ हां. मीच तो. आज आपण बाराच्या गाडीनें जाणार असें ऐकून भेटण्यासाठीं आलों.’

प्रियनाथ म्हणाले, ‘ होय ? ठीक. पण ही पहा ना एक पंचाईत होऊन बसली. मुलगी कांहीं केल्या मला सोडून राहीना. आलीच बरोबर. मी कुठें जाईन कुठें राहीन याचा कांहीं नेम नियम आहे ? पहा बरें हिचा कसा हा वेडेपणा आहे तो ! ’

आतां अरुणनें संध्येकडे पाहिलें आणि आश्चर्यचकित होऊन म्हटलें, ‘ संध्ये, तूंही निघालीस ? ’

संध्येनें फक्त ‘ होय ’ इतकेंच शब्द उच्चारले.

तिचें तें अलिप्तपणाचें उत्तर ऐकून अरुण क्षणभर स्तब्ध राहिला. आणि नंतर अत्यंत संकोचानें म्हणाला, ‘ त्या दिवशीं रात्रीं कांहीं केल्या मला माझें मन शांत स्थिर करतां आलें नाहीं. पण आज निश्चयच केला आहे. तूं सांगितलेंस तें मला मान्य आहे संध्या.’

प्रियनाथबाबूंना या बोलण्याचा कांहींच अर्थ न कळल्यामुळें ते त्या दोघांकडे फक्त पहातच राहिले.

संध्या शांत स्वरानें हळूहळू म्हणाली, ‘ त्या दिवशीं मींही अगदीं उतावीळ आणि चंचल होऊन गेलें होतें अरुणदादा ! पण आज माझेंही मन शांत आणि स्थिर झालें आहे. स्त्रियांना लग्न करण्यावांचून जगांत आणखीं कोणतें एकादें काम आहे कीं नाहीं तें जाणून घेण्यासाठीं आज मी बाबांबरोबर जात आहें. पण आतां जास्त वेळ इथं बोलत उभें राहण्याला आम्हांला तर वेळ नाहीं अरुणदादा. वाटलं तर तूं मला क्षमा कर.’ असें म्हणून बापाचा हात धरून ती पुढें चालूं लागली.

अरुण त्या दोघांबरोबर चालण्यासाठीं पाठीमागून निघाला. पण तो त्याचा प्रयत्न ध्यानांत येतांच संध्या मागें वळून त्याच्याकडे पहात म्हणाली, ‘ नाहीं. अरुणदादा, आमच्याबरोबर तुला येतां येणार नाहीं. तूं घरीं जा.’

अरुण म्हणाला, ‘ संध्ये, या दुःख संकटाच्या वेळीं तूं आपल्या आईला सोडून चाललीस ! ’

संध्येनें जबाब दिला, ‘ काय करूं अरुणदादा, इतके दिवस आईबाप या दोघांनाही सांभाळून राहिलें, त्यांच्या माया ममतेचा उपभोग घेतला पण तें सुख सौभाग्य आज मला अंतरलें. आज कोणाला तरी एकाला सोडण्याची वेळ आली ! आईला यांतून मुक्त होण्याचा उपाय आहे. काल पुष्कळशीं

मंडळी हा आमचा दुर्दैवाचा तमाशा पहायला आली होती. त्याच मंडळीं-तील कांहींनीं म्हटलें, 'एक प्रायश्चित घेऊन आईला यांतून मुक्त होतां येईल.' असलें तर उत्तमच. आणि तसें झालें म्हणजे तिच्या संगतीसोबतीला येणारीं माणसें पुष्कळ आहेत! संगतीसोबतीचा आभाव तिला जाणवणार नाहीं. पण माझ्या बाबांना मात्र या जगांत माझ्यावांचून कोणीच पहाणारं नाहीं. सांभाळणारंही नाहीं. बरं पण आतां असे उभे राहूं नका बाबा, चला.'

असें म्हणून ती पुनः चालूं लागली. अरुण जागच्या जागींच स्तब्ध होऊन उभा राहिला.

थोडेंसें चालून गेल्यावर संध्येला लोकांची गर्दी दिसली. ते लोक पुऱ्या आणि माशांची आमटी या दोन पदार्थांची आणि निरनिराळ्या पक्वान्नांची तोंडभर प्रशंसा करीत व विडा चघळीत चालले होते. रस्ता अगदीं गजबजून गेला होता. जेऊन खाऊन घरीं जाणाऱ्या त्या लोकांचा आनंद पोटांत मावत नव्हता. चांदण्याच्या प्रकाशांत हे लोक आपणाला ओळखतील या भीतीनें संध्या, बापाचा हात धरून त्याच्यासह रस्त्याच्या कडेला छायेंत उभी राहिली. आणि ते लोक निघून गेल्यावर चालूं लागली.

रस्त्याचें वळण ओलांडतांना या सर्व लोकांच्या मेजवानीचा अर्थ ध्यानांत आला. कारण तिथून जवळच गोलोक चतर्जींच्या आमराईत असलेल्या त्यांच्या मोठ्या वाड्यांतून झगझगीत प्रकाशाचे झोत दिसत होते व जमलेल्या मंडळींची गडबड ऐकूं येत होती. पुऱ्या आणा, भाजी आणा, दहीं तिकडे वाढा. साखर कुणी घेतली आहे—वगैरे अनेक शब्दांनीं तो भाग अगदीं दणाणून गेला होता.

प्रियनाथबाबू म्हणाले, 'गोलोक चाटुय्ये महाशयांच्या घरीं आज मांडव-परतणीचें जेवण आहे ना! असल्या कामांत गोलोक कधीं मागेंपुढें पहायचे नाहींत. भला माणूस अगदीं! आज त्यानें चारपांच गांवचे लोक बोलाविले आहेत असें मी ऐकलें. ब्राह्मण शूद्र कोणीच त्यानें वगळले नाहींत. सर्वांना अगदीं मुक्तद्वार!,

संध्येनें आश्चर्यचकित होऊन विचारलें, 'कुणाची मांडवपरतणी बाबा! गोलोक आजोबांची?'

'बापानें उत्तर दिलें, 'होय परवा प्राणकृष्णाच्या मुलीशीं त्याचें लग्न झालें नाहीं का?'

संध्येच्या तोंडून शब्द निघून गेले, 'हरिमतीनें लग्न केलें गोलोक आजोबांशीं? आणि त्याची ही मांडवपरतणी?'

प्रियनाथबाबू बोलले, 'होय. होय. हरिमतीच तिचें नांव वाटतें! गरीब बिचारा ब्राह्मण मुलीच्या काळजींतून मुक्त झाला. मुलगी फार वाढली होती कीं नाहीं? काय ग?'

'कांहीं नाहीं बाबा. चला, इथून शक्य तितक्या लवकर जाऊं.' असें म्हणून संध्येनें बापाचा हात धरला आणि ती त्याला एकप्रकारें ओढीतच रेल्वे स्टेशनकडे चालूं लागली.

* * *

## १९

वडलांसह संध्या जेव्हां स्टेशनावर पोंहोंचली तेव्हां गाडी यायला चांगला अर्ध्या तासाचा विलंब होता.

खेडेगांवांतील लहानसें स्टेशन, विशेषतः रात्रीची वेळ त्यामुळें फारशीं माणसें दिसत नव्हतीं. एकप्रकारें निर्जनताच पसरलेली होती.

फक्त प्लॅटफार्मच्या टोंकाला असलेल्या एका करबी वृक्षाखालीं अंधारांत कोणीतरी एक बाई बसलेली दिसत होती. या दोघांना पहातांच तिनें गडबडीनें मस्तकावरचा पदर थोडासा ओढला.

प्रियनाथबाबू बाजूला सरले पण संध्येच्या तीक्ष्ण नजरेला ती फसवूं शकली नाहीं. संध्येनें एकदोन मिनिटें लक्षपूर्वक त्या स्त्रीकडे पाहून आश्चर्यानें विचारलें, 'ज्ञानदा आक्का? तूं आणि अशी इथें? एकटीचशी?'

संध्येनें ज्ञानदेला बरोबर ओळखलें. ज्ञानदेनें चट्कन हात लांबवून संध्येला आपल्याजवळ ओढलें आणि तिला पोटाशीं धरून ती स्फुंदस्फुंदून रडूं लागली. या तिच्या कृतीनें संध्येच्या आश्चर्याला सीमाच राहिली नाहीं. स्वतःच्या दुर्भाग्याचे भोग भोगतांना ती अर्धमेली झाली होती, तिला आपलें दुःख असह्य वाटत होतें तोंच आपल्याच शेजारीं राहाणारी एक स्त्री आत्यंतिक दुःखानें विगलित होऊन आपल्या आधींच इथें येऊन बसली आहे असें पाहून संध्या आपलें दुःख विसरली. तिला आश्चर्य वाटलें, कारण ज्ञानदेचें दुःख काय आहे हें तिला मुळींच माहीत नव्हतें.

मात्र ती ज्ञानदा आहे असें समजतांच प्रियनाथचा चेहरा एकदम निस्तेज झाला.

संध्येनें विचारलें, 'तूं कुठं जाणार ज्ञानदा आक्का ?'

ज्ञानदेच्या सद्गदित झालेल्या कंठांतून स्पष्ट असा शब्दोच्चारच होईना. तिनें केवळ मान हालवून इतकेंच सुचविलें कीं, 'कुठें जायचें हें माझं मलाच माहीत नाहीं ! काय सांगूं ?'

यानंतर कोणीच कांहीं बोललें नाहीं. कारण काय बोलावें कुणालाच सुचेना, पण गाडी येण्याची वेळ नजीक येत चालली. तिकीट काढणें भाग आहे असें जाणून प्रियनाथ बाबू बोलण्यासाठीं धडपडूं लागले. शेवटीं अस्पष्ट स्वरांत त्यांनीं ज्ञानदेला विचारलें, 'तूं कुठें जाणार ज्ञानदा ? तुझें तिकीट काढून झालें काय ?'

ज्ञानदा मस्तक हालवून 'नाहीं' म्हणाली. नंतर गहिंवरलेल्या स्वरानें तिनें विचारलें, 'तुम्हीं कुठं जाणार ?'

'वृंदावन येथें' प्रियनाथबाबूंनीं उत्तर दिलें.

'संध्याही बरोबरच येणार ?'

ज्ञानदेच्या प्रश्नाला प्रियनाथनीं 'होय' असा जबाब दिला.

नंतर ज्ञानदेनें आपली पदराची गांठ सोडली आणि बरेचसे रुपये बांधून आपले बहुतेक सर्व किंवा मूठभर-प्रियनाथबाबूंच्या पायांशीं ठेवून म्हटलें, 'तिकिटाला किती रुपये पडतात हें मला माहीत नाहीं; पण हे सगळे पन्नास रुपये माझ्याजवळ आहेत. तेव्हां आपल्याबरोबर माझेंही वृंदावनचें एक तिकीट काढा. तेथपर्यंत मला बरोबर न्या. यापेक्षां जगांतील कोणाही माणसाजवळ मी कांहींच जास्त मागत नाहीं. आणि मागणारही नाहीं.'

प्रियनाथबाबू कांहीं वेळ स्तब्ध राहिले; पण शेवटीं ते हळूहळू म्हणाले, 'ठीक आहे. चल आमच्याचबरोबर.'



## आमचें आगामी प्रकाशन

**तोंड मिळवणी** ( कादंबरी ) लेखक मामा वरेरकर

**झेंडूचीं फुलें** ( काव्यसंग्रह ) लेखक आचार्य अत्रे

**उद्यांचा संसार** ( नाटक ) लेखक आचार्य अत्रे

**ब्रँडीची बाटली** ( लघुकथा संग्रह ) लेखक आचार्य अत्रे



लघुकथा संग्रह समीक्षकचे
लघुकथा अंकांतील निवडक
बक्षीस मिळालेल्या कथांचा संग्रह.